अत्र तत्र सर्वत्र

लेखक : प्रा. डॉ. अनिरुद्ध बनहट्टी
anibanister@gmail.com



मुखपृष्ठ : कनक वाईकर
kanak.waikar@gmail.com
Ph : 8888899126

प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान
www. esahity. com
esahity@gmail. com



प्रकाशन : २८ फ़ेब्रुवारी २०१५

अर्पणपत्रिका

चांगली  कथा अनेकदा वाचून

त्या कथेतून वेगवेगळ्या कंगोऱ्यांतून

वेगवेगळे अर्थ काढून

मनसोक्त एंजॉय करणाऱ्या

चोखंदळ वाचकांना

हा कथासंग्रह अर्पण करीत आहे.

अनिरुद्ध बनहट्टी

The truth is not for all men, but only for those who seek it.

Ayn Rand

**इथे** आल्यानंतर रेवतीला नेहमी प्रश्न पडायचा की ही जागा, ही खोली खरोखरच अस्तित्वात आहे की नाही, की आपल्याला झालेला फक्त आभास आहे? त्याला कारण देखील तसंच होतं. कधी तिला ही खोली अगदी सहज सापडायची. तिचा तसा इरादा नसतांनाही ती इथे आपोआप येऊन पोहोचलेली असायची आणि कधी तिनं ही खोली कुठे आहे ते आठवून इथे येण्याचा प्रयत्न केला तर ती त्या मॉलच्या बेसमेंटच्या कॉरिडॉर्समधे, तळघराच्या बोळकांड्यांमध्ये वातानुकूलन यंत्रांच्या चौकोनी नळकांड्यामधून फिरत रहायची. कधी कधी अचानक तिला ते परिचित दार दिसून ती खोली सापडायची! एकदा तिच्या मनात अशी विचित्र कल्पना आली होती की ही खोली तिच्या बरोबर या मॉलच्या तळघरात लपंडाव खेळतेय! आपली जागा बदलतेय ही खोली वेळोवेळी!

रेवती मॉलमध्ये नोकरीला लागून दोन आठवडे झाले होते. त्या दिवशी तिची आठ तासांची शिफ्ट संपल्यावर ती आपल्या गणवेषाचा नारिंगी रंगाचा कोट कपाटात हॅंगरवर लावून लिफ्टने बेसमेंटमध्ये आपली कायनेटीक घेऊन निघण्यासाठी लिफ्टमध्ये शिरली. तिनं शून्य आकडा असलेलं बटन दाबलं पण काय आश्चर्य! खाली आणि वर दिशा दाखवणारे दोन्ही बाण पॅनेलवर क्षणभर एकत्रच प्रकाशित झाले! मग खडकन आवाज होऊन लिफ्ट खाली निघाली. पार्कींग शून्यव्या मजल्यावर होतं. पॅनेलवर, 'मायनस वन' किंवा 'उणे एक' आकडा असलेलं ही एक बटन होतं, पण ते वापरायला अेक स्पेशल चावी लागायची. इलेक्ट्रिशियन, ए.सी.रिपेअर करणारे इत्यादी लोक ते बटन वापरायचे. पण त्यादिवशी रेवतीची लिफ्ट शून्यव्या मजल्यावर पार्किंगला न थांबता आणखी खाली गेली. लिफ्टची दारं उघडताच संमोहित झाल्यासारखी रेवती सरळ समोरच्या कॉरिडॉरमध्ये चालायला लागली आणि काही वेळानं तिला ते दार दिसलं. तिनं ते दार ढकलताच ते झर्र्रकन, आवाज होत सहज उघडलं. आत एक वेगळाच निळसर प्रकाश होता आणि एखादा पूर्ण फ्लॅट असावा तशी आत रचना होती. सुरूवातीला एक सोफासेट व मधे एक छोटं टेबल, नंतर एका जाड, गर्द निळ्या पडद्यानं वेगळावलेला शयन कक्षासारखा भाग, तिथे एक पलंग, शेजारी पूर्ण उंचीच्या आरशाचं प्रसाधन करण्याचं टेबल आणि शेवटी अगदी लहानसा किचन कट्टा अगदी अद्यायावत फ्रेंच मायक्रो – किचन असतं तसा! डावीकडे एक लहानसा पॅसेज व त्यात आणखी एक लहान दार!

मुख्य दाराला आतून कडी घालून ती आत गेली आणि डाव्या पॅसेजमध्ये असलेलं छोटं दार तिनं उघडलं. एक मोठा टब, एक कमोड, शॉवरचं एक अत्याधुनिक पॅनेल आणि लव्हेंडरचा ताजा-तवाना सुगंध! दरवाजा उघडताच आपोआप आतले दिवे लागावेत आणि बंद करताच आपोआप बंद व्हावेत अशी त्या स्नानगृहाची रचना!

रेवती बाथरूमचा दरवाजा बंद करून आत आली आणि त्या पलंगावर पडली. पडली कसली, धाडकन उताणी कोसळली. तिला पदर खाली पडला आणि घोटीव उरोज श्वासाबरोबर वरखाली होत राहिले. ती एक वेगळ्याच जगात पोहचली होती. तिच्या डोळ्यासमोरून तिच्या लहानपणीची अनेक सुखद दृश्यं सरकत होती! जत्रेतला पाळणा, बर्फाचा काडीला लावलेला गोळा, अंगणात खाटेवर झोपणं अन् पारिजातकाचा सकाळी सकाळी अंगावर पडलेला सडा, फतकल मारून खेळलेले स्कर्टच्या ओट्यात गोळा केलेले सागरगोटे अन् शाळेच्या सहलीत वर्गातल्या शेखरनं झाडामागे मारलेली घट्ट मिठी, लपून पाहिलेला आई बाबांच्या संभोग अन् शीलानं स्वतःशी खेळायला शिकवलं, तेंव्हाचा तो शरीर वितळून बाहेर येतंय असं वाटायला लावणारा पहिला अनुभव.

ती किती वेळ तिथे होती, काय करत होती, बाहेर कशी आली, आपल्या कायनेटीक वरून घरी कशी परतली, तिला काही म्हटल्या काही आठवत नव्हतं. पण घरी गेल्यावर आई म्हणाली होती, ''स्वारी आज जाम खुषीत दिसतेय! अन् किती लख्ख दिसतेय कांती तुझी त्या मॉलमधली भारीपैकी कॉस्मेटिक तर चोरून वापरत नाहीस ना?''

''नाही गं आई! काय मरायचंय का मला, इतकी मस्त नोकरी सोडून? सगळीकडे सी.सी.टी.व्ही. कॅमेरे असतात म्हटलं!''

आणि ती उड्या मारतच जिन्यानं आपल्या खोलीत गेली होती!

त्यानंतर रेवती बरेचदा इथे आलेली. या खोलीत. आणि दरवेळी तिला काही तरी वेगळी जाणीव व्हायची अन् नंतर काहीतरी छानसा तिचा फायदा व्हायचा!

त्या दिवशी रेवतीला अचानक त्या रहस्याचा उलगडा झाला. तळघरात, म्हणजे बेसमेंटमध्ये जमीनीपासून छतापर्यंत पूर्ण उंचीचं एक पॅनेल होतं. ते डावीकडे सरकवलेलं असलं की एक पॅसेज दिसायचा आणि त्या पॅसेजच्या शेवटी तेच ते आश्वासक दार अन् दार उघडल्यावर बंदिस्त, जगापासून वेगळावलेल्या कोषासारखी खोली. तिनं ते भिंतीशी अगदी एकरूप होऊन जाणारं पॅनेल सरकवून पाहिलं दोन-तीन वेळा, अन् ती त्या खोलीच्या कधी सापडण्याच्या, कधी न सापडण्याच्या इतक्या साध्या स्पष्टीकरणावर खुदकन हसली आणि त्या खोलीच्या दाराशी पोहोचली, तिनं अलगद दार ढकललं. तोच निळसर प्रकाश. तिनं आत शिरून दार बंद करून घेतलं.

अन् ती एकाएकी दचकली. तिला अचानक जाणवलं की खोलीत आणखी कुणीतरी आहे. मग बाथरूमकडच्या पॅसेजमधून बाहेर येऊन तो देखील एकदम तिला पाहून दचकला आणि तिच्या समोर स्तब्ध उभा राहिला. आ वासून. तो जरा प्रौढच दिसत होता. रेवती काही बोलणार एवढ्यात त्यानंच बोलायला सुरुवात केली. ''कसली जगावेगळी जागा आहे नं ही! योगायोगानंच मला ही जागा सापडली.'' तो म्हणाला, आणि अचानक पुढे येऊन तिच्या अगदी जवळ उभा राहत, जवळ जवळ तिला खेटून तिचा एक हात आपल्या हातात घेऊन म्हणाला, ''आणि योगायोगानं अचानक मला तू देखील मिळालीस!'' रेवती स्वतःचा हात सोडवून घ्यायला लागली. पण तिथे काहीतरी असं होतं की ती भारल्यासारखी झाली होती. रेवती तीस वर्षांची झाली होती. पण तिचं अजून लग्न जमलं नव्हतं. दिसायला ती तशी चांगली होती, पण स्मार्टपणे राहणं तिला माहितच नव्हतं, मध्यमवर्गीय कुटुंबातील ती एकलुती एक मुलगी होती त्यामुळे तिला अगदी सुरक्षित, आखीव जगण्याची सवय झालेली होती. तीस वर्षाची होऊनही लग्न न जमल्यानं एक चमत्कारिक न्यूनगंड तिच्या मनात तयार झालेला होता.

या सगळ्या गोष्टींचं एकत्र दडपण तिच्या मनावर असल्यानं त्यानं आपल्या मिठीत तिला घट्ट आवळून तिच्या ओठांवर ओठ ठेवले तेव्हा ती प्रतिकार करू शकली नाही. तिनं काहीच प्रतिकार केला नाही. तिची हनुवटी वर करून तिचा चेहरा ओंजळीत घट्ट धरून त्यानं पुन्हा तिचे ओठ आपल्या ओठात चुरमडले. दातांनी बारिक चावे घेत त्यानं तिचा अधरोष्ठ आपल्या तोंडात ओढून धरला दुसऱ्या हातानं तिचा स्तन कुरवाळत त्यानं एकाएकी तो स्तन गप्पदिशी घट्ट दाबून धरला अन् बरोबर त्याचक्षणी तिच्या ओठावर कचकन दंश केला आणि ओठ दातामध्ये तसाच धरून ठेवला. ती त्याच्या मिठीत छटपटली पण अचानक सगळा प्रतिकार सोडून देऊन तिनं त्याच्या गळ्यात हात टाकले आणि तिनं त्याला घट्ट मिठी घातली. पुरुषी स्पर्शाचा हा पहिलाच अनुभव तिला घायाळ करून गेला. तो तिचे स्तन चुरगळत राहिला आणि ओठ विलग करून त्यानं आपली जीभ तिच्या तोंडात सारली. तिची त्याच्या मानेवरची मिठी आणखीनच घट्ट झाली आणि एखाद्या सुवर्ण पदकासारखी ती त्याच्या गळ्यात लटकली. तिचे पाय जमिनीवरून सुटले आणि जणू पृथ्वीशी नातं तुटून ती स्वर्गात विहार करायला लागली. एखाद्या बाळानं आईचं स्तनपान करावं तितक्या उत्कटतेनं ती त्याची जीभ चोखत राहिली आणि अचानक आपला बांध फुटतांना तिला जाणवला. जणू तिचा आत्मा द्रवरूप होऊन तिच्या शरीरातून बाहेर लाटालाटांनी वाहत होता. काजूच्या पक्व फळासारखा तिचा सुगंध त्या निळसर प्रकाशाच्या खोलीत भरून उरला. त्यानं तिचा कुर्ता वर सरकवताच तिचे हात आपोआप वर झाले आणि तिच्या सलवारचा नाडा त्यानं खेचताच ती गळून पडलेल्या सलवारमधून पाय बाजूला काढून पुन्हा त्याच्या गळ्याशी बिलगली. उरलीसुरली दोन वस्त्रं देखील त्यानं सहज तिच्या शरीरावरून उतरवली आणि तिला पलंगाकडे नेत त्यानं हात तिच्या डोक्याच्यावर ताणून धरत तिला पलंगावर उताणी पसरवली आणि तिच्या ओठांवर ओठ ठेवून पुन्हा तिला चुंबायला सुरूवात केली. थोड्यावेळात तो झटकन खाली उतरला व आपले कपडे

ओरबडून फेकून पुन्हा तिच्यावर झुकला. त्यानं प्रयत्न केला पण अडथळा जाणवताच तिची पहिली वेळ असल्याचं लक्षात येऊन तो जास्तच उत्तेजित झाला. त्यानं हळू हळू तिचा पूर्ण ताबा घेतला. तिच्या डोळ्यातून घळाघळा अश्रू ओघळत होते आणि त्याच्या ओठांमध्ये तिचे ओठ बंदिस्त असल्यानं घशातच दबलेल्या आवाजात ती कण्हत होती. पण हळू हळू तिच्या वेदना कमी झाल्या आणि मग तिचं शरीर नृत्य केल्यासारखं त्याच्या शरीरासोबत लयीत हालचाल करायला लागलं. शेवटी तिच्या डोळ्यापुढं अनेक ताऱ्यांचा एकत्र स्फोट झाला आणि आपला श्वासोच्छवास बंद होतोय असा आभास तिला होत असतानाच त्याचा देखील स्फोट झाला आणि ज्वालामुखीच्या उष्ण उद्रेकात दोघेही थरथरत राहिले. त्यांची शरीरं झंकारत राहिली. दोघांनाही आपण शरीरातून बाहेर तरंगत असून आपल्या दोघांच्याच एकत्र जोडलेल्या शरीराकडे पाहतोय असा काही क्षण भास होत राहिला.

**********

‘‘**इथे,**’’ तो जोरात ओरडला, ''कुठल्याही व्यक्तीचं नाव घ्यायचं नाही!''

त्याच्या ओरडण्यानं दचकून रेवती त्याच्याकडे अवाक् होऊन पहात राहिली. पहिल्या संभोगानंतर दोघेही तिथून न बोलता वेगवेगळे बाहेर पडले होते. अन् त्यानंतर चार वेळा त्यांची इथे भेट झाली होती. दोन वेळा रेवती येऊन थांबली असता दहा मिनिटांच्या आतच तो देखील तिथे आला होता, आणि दोन वेळा तो आधी येऊन थांबला असता दहा मिनिटांच्या आत रेवती तिथे पोहोचली होती. आधी काहीही न ठरवता, टेलीपथी झाल्यासारखे ते इथे येत होते. नंतर त्यांच्यात बोलणं सुरू झालं होतं, पण दोघांनी फक्त ‘मी–तू’ करून संभाषण, ते देखील तुटक केलेलं होतं आणि आज रेवती त्याला स्वतः विषयी सांगणार होती, त्यासाठी तिनं ‘‘माझं नाव.....’’ अशी सुरूवात करताच तो जोरात ओरडला होता. ‘‘इथे कुठल्याही व्यक्तीचं नाव घ्यायचं नाही!’’ आपल्याकडे अवाक् होऊन पाहणाऱ्या रेवतीकडे पाहत तो म्हणाला, ‘‘इथे बाहेरच्या जगातलं काहीच आणायचं नाही! अशी संदर्भरहित, निरपेक्ष, ॲब्स्ट्रॅक्ट संभोग करण्याची जागा आपल्याला मिळालीय ती मुळीच प्रदूषित करायची नाहीय!’’ त्याची शुद्ध भाषा ऐकून तिला आश्चर्य वाटलं. कोण होता तो? त्याला आपल्या स्वतःविषयी सगळं सांगू, तो कोण आहे ते जाणून घेऊ, त्याच्याशी लग्न करू, असे स्वप्नांचे तिच्या मनातले इमले धडाधड कोसळून पडले! हा तर फार वेडा दिसत होता! पण ती स्वतःदेखील इथेच होती! आणि इथल्या त्या जगाशी नाळ तुटलेल्या अवकाशाचा तिच्यावर देखील परिणाम झाला. त्या निळसर प्रकाशात नग्न अवस्थेत ती उभी होती आणि तिचं पूर्ण व्यक्तिमत्वच नेहमीची ती स्वतः यापेक्षा खूप वेगळं झालं होतं. उत्क्रांत झालेलं होतं. पण एकाएकी तिच्या मनात राग दाटून आला.

त्याच्याबद्दल, त्याच्या ओरडण्याबद्दल. ती तट्कन त्याच्यापासून दूर गेली. दाराकडे जात ती सोफासेटपाशी गेली. आज इथे येतांना तिनं जीन्स आणि टीशर्ट घातला होता. ब्रा आणि पॅंटीशिवाय. ती टी शर्ट पटकन घालून जीन्स झटकून त्या स्किन टाइट जीन्समध्ये एक पाय अडकवून लंगडी खेळायला लागली, तर त्यामुळे तिचे गोल मागे फुलारलेले नितंब ती त्याच्याकडे वळताच त्याला दिसले, आणि झर्रर्रकन तो पलंगापासून दोनच ढांगामध्ये तिच्यापर्यंत आला. तिच्या उघड्या नितंबावर जोरात फाडफाड दोन थपडा मारून त्यानं तिचे खांदे धरून तिला सरळ उभं केलं. तिच्या हातातली जीन्स गळून पडली. हनुवटी पुढे करून छाती काढून ती त्याच्यासमोर आव्हान दिल्यासारखी उभी होती.

''सोड मला !''

त्याच्या पकडीतून सुटण्याची धडपड करत ती म्हणाली, त्यानं एक हात सोडला व तिच्या उजव्या डाव्या गालावर फाडकन लागोपाठ एक सरळ व एक उलट्या हाताची झापड मारली.

''डॅम इट!'' तो ओरडला

''तू माझी आहेस! यू आर माओीन! अॅंड आय ॲम युवर्स! ''

ती एकाएकी हुंदके द्यायला लागली आणि शक्तिहीन झाल्यासारखी त्याच्या गळ्यात पडली. त्यानं तिचा टी-शर्ट धरून वर ओढताच तिनं मुकाटपणे हात वर केले व त्यानं झटक्यानं तिचा टी-शर्ट काढून सोफ्यावर फेकला. एका हातानं तिचा स्तन आवळून त्यानं दुसऱ्या हातानं तिचे केस अगदी डोक्याजवळ धरून खसकन खाली ओढताच तिचा चेहरा वर वळला. तिच्या किंचित विलग झालेल्या ओठावर आपले ओठ ठेवून त्यानं हपापल्यासारखी तिची चुंबनं घ्यायला सुरूवात केली. तिनं त्याच्या शर्टमध्ये गळ्याजवळ हात घालून जोर लावून लावून खाली खेचताच त्याचा शर्ट थोडा फाटला व तडातडा बटनं चारी बाजूला उडून त्याची छाती, पोट उघडं पडलं. शर्टच्या आत त्यानं इतर काही घातलं नव्हतं. तो मोठ्यानं हसला व काहीच पूर्व सूचना न देता अचानक खाली जमिनीवर बसला. तिचे नितंब पंज्यामध्ये आवळून त्यानं तिचं शरीर आपल्याकडे ओढत तिच्या पोटावर ओठ टेकवून जीभ तिच्या बेंबीत नाचवत तो खाली सरकत राहिला. आतापर्यंत त्यानं हा प्रकार केलेला नव्हता. त्याच्या जिभेचा ओला स्पर्श जाणवताच ही शहारली व आपसूकचं तिनं त्याचं डोकं धरून आपल्या मांड्यांमध्ये ओढून घेतलं. ती पलंगावर बसती झाली व त्यानं जमिनीवर गुडघे टेकून तिच्या मांड्या वेगळावून धरल्या आणि तो तिची सखोल चव घेत राहिला. तिनं टरकावून टाकलेला आपला शर्ट त्यानं बाजूला फेकला. आपले इतर कपडे ओरबाडून तो मंत्रमुग्ध पणे पाहणाऱ्या तिच्याकडे पुन्हा वळला. आजची त्याची उत्तेजना तिच्याही कल्पनेबाहेरची होती. तिचं डोकं दोन्ही हातांनी धरून त्यानं आपल्याकडे झुकवलं तिनं नाजूकपणे ओठ फिरवून चेहरा बाजूला केला. पण त्याच्यापुढे तिचं काहीच चाललं नाही. तिची हनुवटी एका हाताच्या ओंजळीत धरून त्यानं तिचं नाक जोरात दाबताच

तिचं तोंड उघडलं अगदी हळुवारपणे प्रवेश करत त्यानं तिला नवीनच सुख दिलं. तिला स्वतःला स्वतःचं आश्चर्य वाटत होतं. पण तिच्या तोंडाला पाणी सुटत होतं आणि ती चव आपल्याला आवडतेय की काय असा किंचितसा विचार मनात आल्याबरोबर तिचा दुसरा बांध देखील फुटला आणि तिच्या स्त्रीत्वाच्या सुंगधाचा घमघमाट सर्वत्र भराभर पसरायला लागला. शेवटचा कडेलोट एकत्र अनुभवल्यानंतर बराच वेळ ते तसेच पडून होते. मग जाग आल्यासारखं होऊन तिनं त्याच्या गळ्याभोवती हात टाकताच तो देखील प्रतिसाद द्यायला लागला. हळूहळू पुन्हा ते आदिम नृत्य सुरू झालं. त्यानं एकाएकी भलत्याच जागी प्रवेश करताच ती कळवळली. हे काय असा अनैसर्गिक शृंगार कसा करू शकतात? तिचे प्रश्न तसेच तिच्या मनात अनुत्तरित राहिले. आधी वेदना आणि मग हळूहळू सुखाच्या लाटांमध्ये तिचं अस्तित्वच बुडून गेलं. तो उन्मतपणे अगम्य शब्दरहित आवाज काढत होता, आणि तिचं हतबल शरीर आता त्या नृत्यात देखील सामिल झालं. उष्ण स्फोट खोलवर पोहाचताना जाणवून तिचा ताबा देखील सुटला आणि पक्व काजूच्या फळासारखा वास त्या निळसर प्रकाशात आणखीनच घनदाट होत गेला.

रेवती घरी परतली तेव्हा तिचे आईवडिल तिची वाटच पहात होते. आईनं तिच्या तोंडात पेढा कोंबतच तिला ती आनंदाची बातमी सांगितली. ''डोईफोडेंकडचा होकार आलाय'' ती रेवतीला मिठी घालत म्हणाली. बाबा आरामखुर्चीत बसून स्मित करत करत होते. तिला वसंत डोईफोडे आठवला. आठवड्यापूर्वी तिला पाहून गेलेला आय. टी. इंजिनिअर. हे कसं काय झालं? तिला खरं तरं वसंत डोईफोडे आवडला नव्हता. खप्पड गाल, जाड चष्मा अन् स्वतः विषयी प्रचंड अहगंड! ती दचकली. नकळत ती त्याची तुलना त्या निळ्या प्रकाशातल्या अज्ञात माणसाशी करत होती. तो चाळीशीचा वाटत असला तरी अतिशय देखणा होता. पण तिनं स्वतःला सावरलं. सगळा संभोगाचा शिळोपा अंगावरून धुवून काढण्यासाठी ती बाथरुममध्ये घुसली. दार लावून शॉवर सुरू करून तिनं जीन्स ओरबाडून काढायला सुरूवात केली. रात्री झोपतांना तिचं पहिल्यांदा हाताकडे लक्ष गेलं आणि ती दचकली तर्जनीत पुष्कराजची पिवळी धमक अंगठी नव्हतीच! कुठे गेली? तिनं बाथरुममध्ये पाहिली, नाही. सगळीकडे शोधली. पण तिला मध्येच आठवलं – तिनं ती अंगठी त्या निळ्या प्रकाशात बोटातून काढून त्या पलंगाजवळ ड्रेसिंग टेबलवर ठेवली होती. अगदी स्पष्टपणे तिला आठवलं. उद्या मॉलमध्ये गेल्याबरोबर ती अंगठी घ्यायची असं तिनं ठरवलं. अगदी न विसरता. आणि रात्रभर तिला स्वप्नात निळ्या प्रकाशात झळाळणारी ती पिवळी धमक सोनेरी अंगठी दिसत राहिली.

दुसऱ्या दिवशी सकाळी चहा घेताना तिनं पेपरचं पहिलं पान उलटलं, दुसऱ्या पानावर नजर फिरवून ते मागे दुमडलं आणि तिसऱ्या पानावर ती पहातच राहिली त्याचा फोटो. तिचा ––काय बरं म्हणता येथील त्याला? कोण होता तो तिचा? ....तिचा प्रियकर? प्ले मेट! ते प्रेम थोडीच करत होते? तिचा त्या निळ्या प्रकाशातल्या खेळातला सवंगडी! अभिषेक रंजन नाव होतं

त्याचं! तिनं ती पूर्ण बातमी नीट वाचली. पुन्हा पुन्हा. पाच वर्षापूर्वी त्याची बायको अपघातात वारली होती आणि त्याच्यावर आपल्या बायकोचा खून केल्याचा आरोप होता. पण काल कोर्टानं त्याची निर्दोष सुटका केलेली होती. पोलिसांवर ताशेरे ओढलेले होते. पूर्ण हकिकतीप्रमाणे एक तर तो अपघात किंवा आत्महत्या अशा प्रकारचा मृत्यू होता. पण तरीही तो निर्दोष होता का? म्हणून तर तो बाहेरच्या जगातलं काही त्या खोलीत येऊ देत नसेल? पोलिसांना पैसे चारून त्यानंच तर केस दाखल करण्यात त्रुटी राहण्याची व्यवस्था केली नसेल? तो खरंच खुनी होता, तिचं एक मन म्हणालं. लागोपाठ दोन थपडा तिला मारतांनाचा त्याचा क्रूर चेहरा तिच्या डोळ्यासमोर आला. खुनी! खुनी होता तो! तिच्या पोटातून भीतीची थंड, धारदार सुरी फिरत राहिली.

पण तो खूप श्रीमंतदेखील होता. बातमीत ते देखील दिलेलं होतं. रेसच्या घोड्यांची पैदास करण्यासाठी असलेलं एक स्टड फार्म त्याच्या मालकीचं होतं. चेन्नईकडे कुठेतरी.

तिनं ठरवलं, आता त्या निळ्या खोलीत पुन्ही कधीच जायचं नाही. पण तिच्या डोळ्यासमोर ती पुष्कराजची अंगठी तरळली. खडा आणि सोनं मिळून निदान साठ–सत्तर हजारांची सहज असेल सध्याच्या सोन्याच्या भावाप्रमाणे .

तिला स्वतःवरच चीड आली. सगळं चांगलं जमत आलं असतांना हे काय करून बसली होती ती? तिचा चुलत भाऊ ऑस्ट्रेलियात सेटल झालेला होता. तो पोरका असल्यानं तिच्याच आईवडीलांनी त्याचा सांभाळ केला होता आणि आता रेवतीला वसंत डोईफोडे नं होकार दिल्याची बातमी काल बाबा त्याला सांगत होते. तेव्हा तो म्हणाला होता. ''आता रेवतीचं लग्न झाल्यावर मी तुमचं ऐकणार नाही हं, भाऊ काका, तुम्हाला आणि काकूला कायमचं माझ्याबरोबर घेऊन येणार ऑस्ट्रेलियाला. रेवतीच्या लग्नानंतर त्यावर बाबा म्हणाले होते, ''हो नं ! येऊ आम्ही ! आणि रेवतीसुद्धा लग्नानंतर निदान दोन वर्षे यु.एस.लाच जाणार आहे. अन् आता हे !

पण मॉलमध्ये शिरताच तिचा विचार पक्का झाला. कार्ड पंच करून कामाला लागण्याआधी ती घाईनं बेसमेंट पार्किंगला गेली लिफ्टमधून. मग तिथून एक जिना उतरून ती एअर कंडीशनच्या चौकोनी डक्टला फॉलो करत त्या पॅनेलपाशी गेली. ते पॅनेल तिनं सरकवताच एक अरुंद बोळकंड उघडलं. ती त्या बोळाच्या शेवटाला असलेला दारापाशी गेली. धडधडत्या छातीनं तिनं दार ढकललं. दार उघडलं तिनं आत डोकावून चाहूल घेतली. नाही. तो नव्हता. मग तिचं ड्रेसिंग टेबलकडे लक्ष गेलं. अंगठी तिथेच होती. झळाळती सोनेरी. ती चटकन आत गेली आणि अंगठी घेऊन झटकन बाहेर आली आणि त्या बोळातून बाहेर येऊन तिनं पॅनेल सारून तो मार्ग झाकून टाकला. एअर कंडीशनच्या डक्ट खालून वळत चळत जात तिनं शेवटी तिना गाठला. जिन्यावर दडादडा चढतानाचा तिनं उजव्या हाताच्या तर्जनीवर ती पुष्कराजची अंगठी चढवली आणि ती लिफ्टमध्ये शिरली. तिनं सुटकेचा एक मोठा निःश्वास टाकला.

मॉल अगदी नुकताच उघडत होता. कर्मचारी येऊन आपाआपल्या जागांवर स्थिरस्थावर होत होते. रेवतीची ड्यूटी तिसऱ्या मजल्यावर होती. पण ती विचारात अगदी गुंग झालेली होती. शिवाय ती लिफ्टमध्ये एकटीच होती. त्यामुळे लिफ्ट वर वर जात राहिली. त्याचं तिला भानच नव्हतं. लिफ्टमधून ती सहाव्या मजल्यावर बाहेर आली. सहाव्या मजल्यावर फूड कोर्ट होतं. ओफ्फोहो ! तिनं कपाळावर हात मारला ! ठीक, तिनं विचार केला, आता आलोच आहोत तर एक कप कॉफी घेऊन जाऊ! तिनं पाच रुपयाची दोन कॉईन्स टाकून यंत्रातून कॉफी घेतली आणि ती कोपऱ्यातनं एक टेबल निवडून तिथे बसली. विचारमग्न अवस्थेत त्या छोट्याशा गोल टेबलावरच्या गुंतागुंतीच्या नक्षीत पहात ती कॉफीचे घोट घेत होती. पाचव्या घोटाच्या वेळा तिला अचानक काहीतरी जाणवलं आणि तिनं वर पाहिलं.

तो तिच्या समोरच खुर्चीवर बसला होता! अभिषेक रंजन! आज सकाळपर्यंत त्याचं नाव सुद्धा तिला माहित नव्हतं! त्यानं मुद्दाम लावल्यासारखा काळा गॉगल लावला होता आणि कपाळावर खूप खाली येणारी एक कापडी हॅट घातलेली होती. पण तिनं त्याला लगेच ओळखलं. दचकून तिच्या हातातला कॉफीचा प्लॅस्टिकचा प्याला टेबलावर पडला. ती झटकन् उठायला लागली तर तिचा दंड घट्ट पोलादी पकडीत धरून त्यानं तिला जबरदस्तीनं खाली बसवलं, ''तू पेपरमधील ती बातमी वाचलेली दिसतेयस!'' तो म्हणाला,

''पण आधी माझं पूर्ण ऐकून घे.'' ती त्याच्याकडे अविश्वासानं बघत राहिली.

''तो खरंच अपघात होता. मी उलट तिला वाचवायला गेलो. ती तशीच होती. तिचं मानसिक संतुलन नीट नव्हतं. खरं तर आधी देखील तिनं दोन वेळा मला अशीच धमकी दिली होती. पण यावेळी....'' रेवती मनातल्या मनात इथून सुटावं कसं याचा विचार करत होती. त्याच्या बोलण्याकडे तिचं लक्ष नव्हतं. पण अचानक तो काहीतरी सांगायला लागला तेव्हा तिचं पुन्हा त्याच्याकडे लक्ष गेलं. ''इथे माझा बंगला होता. मॉल बांधण्यासाठी मी ही जागा विकली. म्हणून माझ्यासाठी आर्किटेक्टनं ती खास खोली तयार केलीय. ती निळ्या प्रकाशाची ॲब्सट्रॅक्ट खोली!''

''खरंच?'' ती चुकून बोलून गेली.

''हो, रेवती, खरंच,'' तो म्हणाला,

''रेवती, मला तुझं नाव काय तुझी सगळीच माहिती आहे. रेवती, मी तुझ्या प्रेमात पडलोय. मी खूप श्रीमंत आहे. रेवती, माझ्याशी लग्न करशील?'' त्यानं गॉगल काढून तिच्याकडे पाहिलं त्याचे चकाकते तपकिरी डोळे दिवसाच्या प्रकाशात वेगळेच दिसत होते. तो वेडा आहे. तिच्या मनात विचार आली. ''रेवती, मी निर्दोष मुक्त झालोय. मी फक्त बेचाळीस वर्षांचा आहे. आपण लग्न करू. आपण सगळं जग एकत्र पाहू!'' त्याची नजर तिच्या शरीरावरून फिरत होती. तो नक्कीच खुनी

आहे! तिला त्याचा दात विचकवलेला चेहरा भेवडायला लागला. तिनं उठण्याचा पुन्हा प्रयत्न करताच त्यानं पुढे झुकून तिचा खांदा दाबून तिला पुन्हा जबरदस्तीनं बसवलं. आता गिऱ्हाइकांची तुरळक गर्दी मॉलमध्ये फिरायला लागली होती. ''रेवती,'' तो आता जरबेच्या आवाजात बोलायला लागला होता. पण अगदी तळमळून मनापासून बोलल्यासारखा, ''रेवती, मी तुझ्यावर प्रथमपासूनच प्रेम करतोय...'' त्याचे डोळे तिला तीव्रतेनं रोखलेले जाणवले. तिच्यावरच तिला त्यानं मारलेल्या दोन थपडा अन् त्यावेळचा त्याचा दात विचकलेला चेहरा आठवला. ''रेवती प्लीज, मी तुझ्याशी लग्न करू इच्छितो. हो म्हण !'' तिनं आतापर्यंत दाबलेलं हुंदका बाहेर फुटला. ती नाही, नाही अशी मान हालवत राहिली. तिचे अश्रू उजवी डावीकडे शिंपडले जात राहिले. ''रेवती,'' एकाएकी त्याचा आवाज विकृत झाल्यासारखा झाला.

''निदान एकदा शेवटच्या वेळी... त्या निळ्या प्रकाशात... हे तुला मानावंच लागेल. फक्त एकदा! तुला यावंच लागेल!''

मागच्या फळांच्या स्टँडवर कुणीतरी दुसऱ्या कुणाला तरी हाक मारली, ''अभिषेक, इकडे ये !'' त्यानं दचकून तिकडं वळून पाहिलं. त्याचं नाव देखील अभिषेक रंजन होतं ना! ते तीन चार सेकंद रेवतीला पुरेसे होते. सर्रर्रकन खुर्ची सरकवून ती जीव खावून पळत सुटली. अभिषेक पुन्हा वळला तो पर्यंत रेवती धावत सरकत्या जिन्याकडे जात होती. तिच्यामागे ''रेवती, थांब रेवती माझं ऐकून घे,'' करत धापा टाकत अभिषेक रंजन पळत होता. रेवती सरकत्या जिन्यापाशी पोहोचली तर तो जिना वर येत होता! खाली जाणारा जिना हॉलच्या दुसऱ्या टोकाला होता. पण काही विचार न करता रेवती त्या वर सरकत्या जिन्यावरून धडघड उतरत राहिली. बाजूचा कठडा न धरता. जिन्याच्या मध्याशी ती आली असतांना तिच्या लक्षात आलं की ती एकाच जागी स्थिर झालीय. ज्या वेगानं ती खाली उतरत होती तितक्या वेगानं पायऱ्या वर येत होत्या. त्यामुळे ट्रेडमिल वर जागच्या जागी जॉगिंग केल्यासारखी तिथेच ती स्थिर झाली होती. ते लक्षात येताच तिनं पायऱ्या उतरण्याचा वेग पुन्हा वाढवला. मॉलच्या या भागात विशेष गर्दी नव्हती. अभिषेक रंजन सरकत्या जिन्याच्या वरच्या टोकाशी थांबून राहिला होता. पायऱ्या उतरण्याचा वेग वाढवताच रेवती वर सरकणाऱ्या जिन्यावरून धडधड करत खाली उतरायला लागली. अभिषेक ''रेवती, रेवती थांब !'' करत वरती धापा टाकत होता. शेवटच्या दोन पायऱ्यावर रेवती जरा धडपडली, पण जिना पूर्ण पार करून जमिनीवर पडली. तिला धडपडतांना पाहून अभिषेकला राहवलं नाही आणि तो सरकत्या जिन्यावर तिच्या सारखाच कठडा न धरता खाली भराभर उड्या मारत उतरायचा प्रयत्न करायला लागला. तोपर्यंत खालच्या मजल्यावरच्या फरशीवर पडलेली रेवती उठून उभी राहिली होती. ती खाली जाणाऱ्या सरकत्या जिन्याच्या दिशेनं पळायला लागली. अजून देखील गर्दी तुरळक होती आणि तिच्याकडे कुणाचं लक्ष नव्हतं. एवढ्यात अभिषेकचा तोल गेला आणि तो त्या सरकत्या जिन्यावर पडला. त्यानं जोरात किंकाळी फोडली. त्याचं डोकं लोखंडी पायरीच्या कडेवर आदळलं. एका सुरक्षा

कर्मचाऱ्यानं ते पाहिलं आणि तो जिन्याकडे धावला. रेवतीनं अभिषेकचं डोकं आपटलेलं आणि रक्त उडालेलं पाहिलं. पण ती तशीच खाली सरकणाऱ्या जिन्याकडे वेगानं चालत राहिली. दोन सरकते जिने उतरून आपल्या काऊंटरवर आपल्या कामाच्या जागी जाऊन काही मिनिटं शांतपणे बसून राहिली. एकाएकी एमर्जन्सीचा सायरन वाजायला लागला. तिच्या शेजारच्या काउंटरवरची कत्रीना कैफ, खरं तर तिचं नाव सावित्री गोसावी होती. पण सगळे तिला कत्रीना म्हणायचे, तर ती म्हणाली, ''कसला तरी ॲक्सिडेंट! या आठवड्यात तिसऱ्यांदा!'' रेवती निर्जीवपणे हसली. नंतर यांत्रिकपणे गिऱ्हाइकांच्या वस्तू कांप्युटरवर बडवून त्यांना बिलांच्या लांबड्या पट्ट्या देत राहिली. तासाभरानं बातमी आली. तो ऐस्केलेटरवर, सरकत्या जिन्यावर पडलेला माणूस हॉस्पिटलमध्ये नेतांना ॲब्युलन्समधेच खलास झाला! वर जाणाऱ्या एस्केलेटरवर उड्या मारत खाली येण्याचा स्टंट करत होता तो!

रेवती एका ग्राहकाचं बिल बनवता बनवता मधेच मटकन त्या गोल फिरणाऱ्या स्टुलावर बसली. दोन्ही हातांमध्ये तिनं चेहरा दडवला.

''काय झालं गं?'' शेजारची कत्रीना कैफ उर्फ सावित्री गोसावी म्हणाली.

''कसंतरीच वाटतंय. तू ठीक आहेस नं? प्लीज हे बिल कर नं पूर्ण!''

रेवतीनं मनाशी काही ठरवलं. आपला मोबाईल काढून घरी बाबांना फोन केला.

''बाबा प्लीज कार घेऊन या नं! मला कसंतरीच होतंय. अन् मला बिलकूल थांबायचं नाहीय.'' ती आजूबाजूला पहात म्हणाली,''इथे !''

''ठीक!'' तिचे बाबा म्हणाले.

तिनं कत्रीनाला आपला काऊंटरपण सामावून घ्यायला सांगितला अन् थकून डोकं समोरच्या कंप्युटरवर टेकवलं.

''इथे'', ती मनात म्हणत होती,

''मला मुळीच थांबायचं नाहीय **इथे !**''

**************

गिरीश गोडसेला आजकाल काय चाललंय ते नीट कळत नव्हतं. सीमारेषा जरा धूसर व्हायला लागल्या होत्या. मानसीला ते बक्षीस मिळाल्यापासून ती सतत तिच्या डिझाइन स्टूडिओत असायची. शिवाय आज दुपारी त्याच्या स्टुडिओत भोशा येऊन त्याचे डोकं खाऊन गेलेला आणि भोशाचं डोकं खाणं म्हणजे काही साधा प्रकार नव्हता. ज्याचं डोकं भोशानं पुरतं खाल्लं होतं ते लोक हल्ली येरवड्याला एक वसाहत करून रहायचे म्हणे! भोशा म्हणजे भोसले. त्यामुळे गिरीश ड्रायव्हिंग करून घरी येत असतांना आपलं डोकं जरा हलकं झाल्यासारखं त्याला वाटत होतं. लाल सिग्नल. आजूबाजूला ट्रॅफिक जॅम. शेजारी जास्तच चीड आणणारा बीआरटीचा रिकामा, रुंद रस्ता. बीआरटी च्या प्रचंड रुंद गुळगुळीत पण रिकाम्या रस्त्यानं दोन्ही बाजूंच्या फूटपाथ पर्यंत चिरडून टाकलेली ट्रॅफिक. त्या रिकाम्या रस्त्यानं चिरडून टाकलेले पुणेकर. ट्रकच्या रांगाच्या रांगा पार्क करून अडवलेले सायकल ट्रॅक! आणि पुणे शहराची लाज झाकण्याऐवजी उघडी करणारे बिकीनीच्या बारीक पट्ट्यांसारखे फूटपाथ ते देखील विविध विक्रेत्यांनी, अस्ताव्यस्त एमएसइबीच्या असुरक्षित बॉक्सेसनी अन् कचरा पेट्यांनी आक्रमित केलेले! सायकल ट्रॅक म्हणे! आजकाल कोण वापरतो सायकल? जणू त्याच्या मनातल्या विचाराला उत्तर देण्यासाठी एक चावट पुणेकर सायकलस्वार गिरीशच्या होंडा सिटी कारच्या खिडकीशी येऊन थांबला. गिरीशनं नाखुषीनं त्याच्याकडे पाहिलं. फारच खडकी-दापोडी वाटत होता तो! चपचपीत तेल लावलेले देवानंदी फुगा काढलेले केस चक्क! अन् भडक फुलाफुलांचा शर्ट! आयला! हॅव अ लाईफ यार! मग एकदम पुन्हा सीमारेषा धूसरल्या. त्या सायकल स्वारानं खट्कन मान नव्वद अंशांत वळवून गिरीशकडे पाहिलं आणि ओठ ताणून दात विचकले. गिरीश दचकला. त्याचा ब्रेकवरचा पाय सटकतच होता. क्षणभरच फक्त. आता गिरीश पहात होता तर तो सायकलस्वार साळसूदपणे समोर पहात होता. च्यायचा! गिरीशच्या मनात रागाचा अेक गोळा उठला. खरंच त्यानं पाहिलं होतं का मान वळवून? गिरीश विचारात पडला. हिरवा दिवा. ट्रॅफिक सुरू झालं. जरा संभाळून राहिलं पाहिजे. अतिरेक नको. नाहीतर मागच्यासारखी स्थिती यायची. पुन्हा ती सगळी ट्रीटमेंट अन् पुन्हा ते लांबलचक री-हॅब! मानसीचं तरी काय चुकलं म्हणा! कंटाळली ती आपल्या नाटकांना. पण नेमका पुरुषच रस्ता चुकतो. गिरीशनं स्वतःचे विचार आवरले. ते दडवून ठेवलेलं सत्यमेव जयते बाहेर यायला नको हे त्यानं आपल्या मनाशी पक्कं केलेलं होतं. म्हणून तर तो जगत होता.

गिरीश गोडसे. प्रसिद्ध चित्रकार – पण एके काळचा. सध्या संपत आलेला – त्या नवीन पोराची, खंडागळेची मुलाखत – 'गिरीश गोडसे सध्या संपलाय – मागच्या पिढीतला – गेल्या पाच वर्षातलं त्याचं एक तरी लक्षणीय चित्र सांगा बरं!' – गिरीशला आठवली.

अन् मानसीनं ही मुलाखत वाचली नव्हती. खंडागळेचं एक सूर्योदयाचं चित्र घेऊन आली होती गिरीशच्या वाढदिवसाला! विकत! फक्त तीन हजार रुपयांना! वर गिरीशला म्हणाली,

''आपण जे. जे. ला होतो नं, तेव्हाची तुझी चित्रं आठवली मला! तू स्टूडंट असतांनाची!'' त्यावेळी हा साला खंडागळ्या सूर्योदय काढत बसला होता वेगवेगळे. अन् त्याच्या मते गिरीश गोडसे संपला होता. चित्रकार म्हणून. स्टूडंट असतांनाची चित्र म्हणे! आयला ही मानसी म्हणजे सुद्धा कठीण आहे. मग खंडागळेची मुलाखत वाचून तिनं ते चित्र फेकून दिलं होतं, आणि आता तो स्टूडंट नव्हता. स्कूल ऑफ फाईन आर्ट मधे निमंत्रित, सन्माननीय प्रोफेसर होता – पण संपलेला खंडागळेच्या मते!

गिरीशनं लाल दिवा पाहून ब्रेक लावला. लोकांच्या एका घोळक्यानं एकत्र माना नव्वद अंशात वळवून गिरीशकडे ओठ विचकून पाहिलं. पण गिरीशनं त्यांच्याकडे रोखून पाहिलं तर ते साळसूदपणे आपापसात बोलत चालले होते. बापरे! गिरीशला अचानक थंडगार भीतीची शिरशिरी पोटात जाणवली. स्टीलच्या फ्रेम सारखी. स्टीलची फ्रेम आणि त्यावर ताणलेला फ्लूरोसंट कॅनव्हास !

गिरीशनं संथ श्वासोच्छवास करून तो वर येणारा विचार खोल खोल दडपून टाकला. दिवा हिरवा झाला.

गिरीश घरी पोहोचला तर मानसी आधीच आलेली आणि जोसेफ बरोबर कंप्यूटरवर काहीतरी चाललेलं. गिरीश आलेला पाहताच ती धावत आली आणि त्याच्या गळ्यात मिठी घालून म्हणाली, ''गिरीश, गेसव्हॉट?? आयाव्ह गॉटीट! मला मिळालं कॉट्रंक्ट!'' ''ओ हो!'' गिरीश म्हणाला. ती त्याला घेऊन गोल गोल नाचायला लागली.

''उद्याच निघालेय मी. जयपूरला.''

''पण नुसतं रिनोव्हेशन की....''

''नाही नाही, रिनोव्हेशन प्लस नवीन बांधकामाचं एक्स्टेन्शन! सगळं मी दिलेले प्लॅन्स वगैरे, तसंच्या तसंच मंजूर ! अन् माझी फी? टू क्रोर! दोन करोड रुपये!'' दोघेही एकमेकांकडे पहात राहिले. जयपूरमधल्या एका राजवाड्याचं रिनोव्हेशन आणि त्याचं अेक्स्टेन्शन बांधून पॅलेस हॉटेलमधे कन्व्हर्ट करायचं! आणि नुसत्या प्लॅनिंग अन् डिझायनिगंची दोन करोड फी! मानसीच्या

एका बंगल्याला ते इंटरनॅशनल 'सीड' ॲवॉर्ड मिळाल्यावर तिची चांगलीच चलती सुरू झाली होती. मानसी त्याच्याकडे टक लावून पहात राहिली. गिरीशला कळलं. तो म्हणाला,''आता तुला तिथे.....''

त्याचं बोलणं अर्धवट तोडून रागावून मानसी त्याचा दंड धरून आपल्याकडे ओढून म्हणाली,''आता आपल्याला तिथे जाता येईल! तिथे जाऊन सेटल होता येईल! ओशन डीप, हिअर वी कम!''

मानसीनं मागे अमेरिकेची ट्रिप करतांना सहज म्हणून मधेच घरं पहायला सुरुवात केली होती. लाँग आयलंडला तिनं 'ओशन डीप' नावाचा एक बंगला पाहिला होता. तिथे सेटल होण्याचा तिचा विचार होता. त्या दृष्टीनं तिचे प्रयत्न देखील चाललेले होते अन् आता जवळ जवळ पूर्ण होत आले होते.

''आता तिथे जाऊन सेटल् होऊ आपण. अमेरिकेत!'' मानसी म्हणाली. मग तिचं एकदम जोसेफकडे लक्ष गेलं.

''ओफ्फोऽऽ! गिरीश, मी पटापट फायनलाअीझ करते सगळं. तू प्लीज मीनाला कॉफी करायला सांग. आम्हाला पण दोन कप पाठवून दे!'' मीना – त्यांच्याकडची दिवसभराची मोलकरीण.

निनाद भोसले उर्फ भोशाचं दुपारचं डोकं खाणं गिरीशला आठवलं.

बायको उडाली भुर्रर... तिच्या यारानं माझ्या कानात केलं कुर्रर... पण त्याची मानसी तर त्याला घेऊन उडण्याच्या तयारीत होती तिथे.

रात्री सगळं काम आटोपून बारा वाजता मानसी गिरीशच्या कुशीत शिरली पलंगावर. मीनाला सांगून तिनं गिरीशच्या आवडीचा स्वयपांक करवला होता आणि सेलेब्रेशन म्हणून 'शातेल रुज' ही भारीपैकी फ्रेंच वाईन उघडली होती. तिची दुसऱ्या दिवशी दुपारी चार नंतरची फ्लाईट होती. सुदैवानं पुणे–जयपूर मिळाली होती.

तिनं गिरीशच्या ओठात ओठ अडकवले. गिरीशनं तिला आपल्याशी घट्ट आवळून घेतलं.

''मानसी.....'' तो म्हणाला,

''आय फील, सो वर्थलेस!''

''गप्प बस हं, सांगतेय!'' त्याला दम देऊन उताणं पाडत मानसीनं त्याच्यावर आक्रमण केलं. त्याच्या ओठांची, छातीची चुंबनं घेत ती खाली सरकायला लागली. ''मूर्ख !'' ती मधेच वर पाहून त्याला चिडवल्यासारखी म्हणाली आणि हसली. त्याबरोबर उलटून तिला गादीवर उताणं पाडत तिचे हात गादीवर दाबून धरत त्यानं तिचं तोंडच बंद केलं आणि तिचा पूर्ण ताबा घेतला.

नंतर मानसी मऊ आवाजात प्रेमानं त्याच्याशी बोलत राहिली.

'' हे बघ, आपल्या आयुष्याचं उगीच 'अभिमान' पिक्चर करू नकोस हं! तू आधी खूप प्रसिद्धी, खूप नाव कमावलेलंच आहेस! त्यामानानी माझं काम चिल्लर आहे अगदी! अन् अगदी जे.

जे. मधे असल्यापासून आपण एकमेकांना ओळखतो की! अगदी अटीतटीनं काही करणाऱ्यांतले आपण नाही आहोत. रिलॅक्स, मस्त आयुष्य आपल्याला जगायचंय!''

''पण गेले खूप दिवस मी काही कामच करत नाहीय गं!''

''न का करेनास! मस्त मजेत रहा! पुन्हा तुझ्या हेल्थचा क्रायसिस येऊ देऊन नकोस!''

गिरीशनं पुन्हा कष्टानंच स्वतःवर ताबा मिळवला. पुन्हा ती स्टीलची फ्रेम अन् तो फ्लूरोसंट कॅनव्हास वर येऊ पहात होता.

''तू सॅमला एक सिरीज पाठवली होतीस नं? लँडस्केप्सची?'' ''हो. त्याला झाले आता तीन महिन्यांच्या वर. काही उत्तर नाही त्याचं.''

सॅम बुलवार्क हा न्यूयॉर्क मधला एक एजंट होता. आर्ट क्रिटिक आणि आर्ट डीलर. त्यानं मागे गिरीशची काही एक्झिबिशन्स न्यूयॉर्कमधे अरेंज केली होती अन् गिरीशच्या एका कॅनव्हासला एक लाख डॉलर्स किंमत मिळवून दिली होती! आतापर्यंत गिरीशच्या पेंटिंगला मिळालेली सर्वात जास्त किंमत!

आणि आता त्यानं दरीत खाली खोल पाहणाऱ्या दृश्यांची एक पंचेचाळीस चित्रांची मालिका सॅमला पाठवली होती. ती चित्रं आठवून तो पुन्हा अस्वस्थ झाला. मानसीला यातली काहीच कल्पना नव्हती. त्यानं सगळं गुपित, सगळं रहस्य आपल्या एकट्याच्या पोटात दडवून ठेवलं होतं.

त्यानं असहायपणे कारच्या खिडकीकडे पाहिलं. खिडकीच्या तावदानावर त्याला एक चेहरा नव्वद अंशात वळून त्याच्याकडे ओठ विचकून पहात असलेला क्षणभर दिसला. पण त्यानं डोळे चोळताच तो नाहीसा होऊन तावदान स्वच्छ झालं.

सगळं कसं एकत्र गुंतलेलं होतं. सीमारेषा अस्पष्ट होत्या. त्यानं काढलेल्या त्या दरीत खोल वाकून पाहिलेल्या लँडस्केप्सकडे पाहिल्यावर खरोखरच भोवळ आल्यासारखी व्हायची. ते चित्र, त्या चित्रातली दरी कॅनव्हास मधे खोल, आत आत जातच राहतेय असा भास व्हायचा. भोशा म्हणायचा,

''शेवटी काय,
तर तिसरा पाय,
भोकात जाय !''

भोशा म्हणजे हाऊीट होता अगदी. अन् एकदम मार्च पास्ट करणाऱ्या सैन्याच्या तुकडीनं नव्वद अंशात माना वळवल्या आणि सॅल्यूट मारण्या ऐवजी एकत्रितपणे ओठ विचकले......

.....अस्वस्थ झोपेतून गिरीश जागा झाला तर त्याला मानसी फोनवर बोलत असलेली ऐकू आली.

''वा ऽऽ व ! यू डोंट से??'' ती एकाएकी ओरडली. आनंदानं. तिनं मागं वळून पाहिलं तर गिरीश अंथरुणात उठून बसला होता. ''याऽऽ! या ऽऽ! ही इज अवेक! टॉक टु हिम!'' तिनं वॉकी फोन पलंगावर आणून ठेवत गिरीशच्या हाती रिसीव्हर दिला.

''सॅम,'' ती चकाकत्या डोळ्यांनी हसत म्हणाली, ''न्यूयॉर्कहून!''

आणि गिरीश ''याऽऽ! याऽऽ! वाऽऽव!'' करत सॅमशी बोलत राहिला तर त्याच्याशी लगटून त्याच्या छातीवर डोकं ठेवून मानसी त्याच्या कानाच्या पाळ्याशी खेळत राहिली.

गिरीशच्या पंचेचाळीस पेंटिंग्जचं प्रदर्शन सॅमनं आधी न्यूयॉर्कमधे आणि मग अमेरिकेतल्या इतर पंधरा एक आर्ट गॅलरीजमधे जमवून आणलं होतं. स्पॉन्सर्स मिळाले होते. जी पेंटिंग्ज विकली जातील त्याचे पैसे तर मिळतीलच पण एक्झिबिशनचं मानधन देखील घसघसशीत मिळणार होतं.

गिरीश खूपच सुखावला. रिलॅक्स झाला. मानसी देखील खूष होती. डबल सेलेब्रेशन! पुन्हा पुन्हा गिरीशला काळजी घ्यायला सांगून ती जयपूरला निघून गेली. तिचा मदतनीस जोसेफ, त्याच्याबरोबर! गिरीशनं स्टूडिओतल्या माळ्यावर एक मोठ्ठं पेंटिंग कापडात गुंडाळून ठेवून दिलं होतं. मनात खोल दडपून ठेवलेलं ते रहस्य. अन् हे चित्र. स्टूडिओत गेल्याबरोबर त्यानं घडीची ॲल्युमिनियम शिडी लावून ते चित्र खाली काढलं. कापडातून काढून ईझलवर लावलं. ते त्यानं खोल दरीत डोकावून पाहिल्यासारख्या लँडस्केप्सची जी सिरीज केली होती त्याचं मूळ चित्र होतं. तो त्या चित्राकडे पहात राहिला. आणि त्या खोल दरीतून प्रतिध्वनी आल्यासारखा त्याला त्या पेंटिंगमधून आवाज ऐकू आला.... ''तिथे.... तिथे.... जायचंय... तुला !'' आणि एक नाव त्याच्या मनात उमटलं :

विशाखा!

तो दचकला. हेच रहस्य तर तो स्वतःचं स्वतःला देखील कळू देत नव्हता.

विशाखा! जयराज स्कूल ऑफ फाईन आर्टस्‌ची त्याची विद्यार्थिनी. त्या दोघांमधे जवळ जवळ वीसेक वर्षांचं तरी अंतर असेल, पण दोघांनाही पहिल्या भेटीतच एकमेकांमधलं प्रचंड आकर्षण जाणवलं होतं आणि ते टाळण्यासाठी गिरीश मुद्दामच तिच्यापासून फटकून रहायला लागला. तिचे आई-वडील ऑस्ट्रेलियात होते, अन् ती एकटी इथे पुण्यात. जेवढा गिरीश तिच्यापासून दूर जायला लागला तेवढी जास्तच ती गिरीशच्या जवळ यायचा प्रयत्न करायला

लागली. आणि मग एक दिवस दुपारी विशाखा गिरीशच्या स्टूडिओत आली आणि तिनं दार आतून लावून घेतलं.

''माझं न्यूड पेंट करा'' म्हणून ती त्याच्या मागे लागली. शेवटी कितीही झालं तरी गिरीश पुरुष होता! आणि त्याच्यातलं आणि विशाखातलं ते निसर्गाच्या एखाद्या जिवंत शक्तीसारखं आकर्षण! विशाखाचं न्यूड शेवटपर्यंत पूर्ण झालंच नाही! तिला देखील त्याचं काही गम्य नव्हतं. कोळशानं – म्हणजे ड्रॉईंग चारकोलनं कागदावर चार रेषा काढल्या असतील नसतील तोवरच गिरीशचा संयम टिकला. आणि मग विशाखा त्याच्या मिठीत होती आणि त्या दिवसापासून तो तिच्या मुठीत !

काही दिवसातच विशाखा ही किती हेकेखोर आहे, किती विचित्र आहे हे त्याला कळून चुकलं. पण तरीही लगाम तिच्या हाती होता. तो तिचं व्यसन सोडू शकला नाही. काही दिवस तिचा संग न मिळाल्यास तोच दरवेळी हार मानून तिला शरण जायचा. भोशा नाहीतरी म्हणायचाच नं :

उतारवयात आल्यावर

पुरुषाची होते उत्क्रांती,

मेंदू जातो खालती ,

अन *** येतो वरती !

शिवाय देअर इज नो फूल लाइक ॲन ओल्ड फूल !

विशाखाला जेव्हा गिरीश आपल्या पूर्ण ताब्यात आलाय हे कळून चुकलं तेव्हा तिनं नवीन मागणी सुरू केली. नवाच हेका धरला. त्यानं मानसीला घटस्फोट द्यावा आणि विशाखाशी लग्न करावं! तेव्हा पहिल्यांदा गिरीशला विशाखाच्या प्रेमाचे साखळदंड जाणवले! पण तोपर्यंत त्याचं पिणं खूप वाढलं होतं. विशाखाबरोबर त्यानं कोकेन आणि अेक्स्टसीचा अनुभव पण घेतला होता आणि मग तो दिवस उगवला.

विशाखानं त्याला खंडाळ्याजवळ एका जागी बोलावलं. जुन्या पुणे–मुंबई हायवे जवळचा अेक त्यांचा आवडता पॉईंट होता तो. तिचा अगदी निर्वाणीचा मेसेज पाहून गिरीश कार घेऊन तिथे गेला. कार कच्च्या रस्त्यानं आत नेऊन तो कड्यापाशी गेला. दाट झुडुपानंतर दोन अगदी जवळ जवळ असलेल्या झाडांमधून पलीकडे गेलं, की अचानक एक सपाट, मोकळी, छोटीशी गवताळ जागा, अन तिथून सरळ उभा खोल कडा. निदान पाचशे सहाशे फूट खोल दरी! आणि दरीतून वर वाहणार भन्नाट वारं!

तिथे त्यांनी दोन वेळा उघड्यावर संभोग केला होता. गवताच्या गालिचावर. अशा असुरक्षित ठिकाणी संभोग करायला गिरीशला भाग पाडण्यात विशाखाला फार मजा यायची ! अन् आपल्या प्रतिष्ठित जीवनाला जपण्यात गिरीश अशा साहसांना अतिशय घाबरायचा.

विशाखा त्याची वाट पाहत होती. शेजारी एक चकचकीत स्टील फ्रेमची फ्लूरोसंट हिरव्या कॅनव्हॉसची हॅवरसॅक! किंवा बॅकपॅक! पाठीवर स्ट्रॅप करायची. मेड इन ऑस्ट्रेलिया. विशाखाला आठवडा आठवडाभर डोंगर दऱ्यांमधे ट्रेकिंग करत भटकायला खूप आवडायचं. गिरीश तिला जवळ घ्यायला लागला तसं त्याला दूर लोटत विशाखा म्हणाली, ''हे पहा, उगीच लाडीगोडी नकोय! तू कधी सांगतोयस तिला?'' ''विशू, असं काय करतेस? एकदम मी असं कसं सांगू?''

''हे बघ, तो तुझा प्रश्नय! मी आज आमच्या ग्रुपबरोबर नागफडीच्या ट्रेकला जातेय. चार दिवसांनी आम्ही परत येतोय. तोपर्यंत तू सांगितलं असलं तर ठीकच, नाहीतर आल्यानंतर तुझ्या घरी येऊन तुझ्या त्या मानसीला मीच सांगेन!'' ती म्हणाली. तिनं एका झाडाच्या बुंध्याशी ठेवलेली ती हॅवरसॅक उचलली आणि आपल्या पाठीवर लादून घेत सवय असल्यासारखे झपाझप स्ट्रॅप्स घट्ट केले, आणि ती म्हणाली,

''तासाभरात खंडाळ्याला जायचंय मला. लक्षात ठेव, मी स्वतः तुझ्या त्या मानसीला सगळं सांगीन ! अन् मग दोन-चार महिन्यात आपण लग्न करू! लक्षात ठेव, तू कबूल केलंयस्.'' गिरीश काहीच बोलत नव्हता.

'तुझ्या त्या मानसीला' म्हणतानाचा तिच्या आवाजातला विखार त्याला अजूनही जाणवत होता. ती त्या मोकळ्या जागेच्या अगदी कडेला गेली. खाली वाकून पहात राहिली. तिचा आवाज अगदी रडवा झाला. रडत रडतच ती जोरात ओरडून गिरीशला म्हणाली.

''मी इथून खाली उडी घेऊन मेले तरी तुला काही वाटणार नाही नं? तू आणि तुझी ती मानसी, तुमची आयती सुटकाच होईल नं?" ती हुंदके देत राहिली. ती स्टेनलेस स्टीलची बॅकपॅकची फ्रेम तिच्या हालचालीबरोबर चकाकत राहिली. तिला समजावायला, तिला मागे ओढायला गिरीश पुढे गेला....... आणि मग यापुढचं गिरीशला आठवायचंच नाही. यानंतर वीस ते बावीस तास गेल्यावर तो एका हॉस्पिटलमधे शुद्धीवर आला होता. मानसी शेजारी बसली होती.

''मी कुठे आहे?'' त्यानं अटळपणे म्हणायचं शुद्धीवर आल्यानंतरचं वाक्य म्हटलं.

''मानसी काय झालं मला?'' त्यानं हात कपाळाकडे नेला. बँडेज.

''तू खंडाळ्याच्या आधी असलेल्या एका कड्यावरून पडलेला सापडलास. एका झाडाला अडकल्यामुळे तू वाचलास. या भागात ठाकर नावाचे आदिवासी आहेत. एकानं तुला

पाहिलं. तुझ्या मोबाईलवरून मला काँटॅक्ट केलं. मी अँब्युलन्स घेऊन आले. आता तू पुण्याच्या हॉस्पिटलात आहेस, काळजी करू नकोस. तुझं डोकं एका दगडावर आपटल्यानं तुझी शुद्ध गेली होती. पण तुला विशेष लागलं नाहीय. नो फ्रॅक्चर्स. तुझी कार एका कच्च्या रस्त्यावर मिळाली.''

''आणि विशाखा? तिचं काय झालं?''

मानसीचे डोळे विस्फारले.

''कोण विशाखा? मला नाही माहित!''

''तिथे विशाखा नव्हती?''

''नाही. पण कोण ही विशाखा?''

गिरीश विचार करत राहिला. काय सांगायचं आता मानसीला? तिला सगळं खरं सांगून टाकायचं? पण सगळं खरं नेमकं काय होतं? नेमकं काय घडलं होतं? तो दरीत कसा काय पडला होता? त्याची विशाखाशी झटापट झाली होती की............ त्याच्या अंगावर शहारा उमटला......की विशाखानं त्याला ढकलेलं होतं? की तिनं आत्महत्या करायला उडी मारली होती अन् तो तिला वाचवायला गेला होता? त्याच्या डोक्याला मार लागल्यामुळे त्याला नेमक्या काय घटना घडल्या ते आठवतच नव्हतं! पण तुटक तुटकपणे त्यानं मानसीला सांगितलं.

''ती जयराज स्कूल ऑफ फाईन आर्टस्‌ची एक स्टुडंट आहे.''

''ओहो, म्हणजे तू एकदा म्हणाला होतास ती ऑस्ट्रेलियावाली?''

''हो. तीच. ती पागलपणा करत होती. माझ्या प्रेमात पडली होती. मी तिला सांगून समजावून थकलो. तिनं मला खंडाळ्याजवळच्या या जागी निर्वाणीचा मेसेज करून बोलावलं.''

''हो,'' मानसी म्हणाली, ''पाहिला मी तो मेसेज तुझ्या मोबाईलवर !''

तेवढाच एक राहिला! गिरीश मनाशी म्हणाला. त्यानं आणि विशाखानं पूर्ण काळजी घेतली होती एकमेकांचे सगळे मेसेजेस लगेच डिलीट करून टाकण्याची आणि एकमेकांचे काँटॅक्ट नंबर्स मोबाईल्सवर कुठेही राहणार नाहीत याची!

''मी तिला सांगत होतो की ते शक्य नाही, माझं लग्न झालेलं आहे, पण ती ऐकत नव्हती.''

''मग?''

''मग काय झालं मला काही आठवतच नाहीय गं मानसी! पूर्ण ब्लँक! एकदम मग मी इथेच शुद्धीवर आलो.''

''ठीकै, ठीकै! तू झोपून जा गाढ! डोक्याला ताण देऊ नकोस! आठवेल नंतर!''

गिरीशनं डोळे बंद केले. त्याच्या डोळ्यासमोर ती स्टीलची चकाकती फ्रेम आणि तो फ्लूरोसेंट हिरवा कॅनव्हास चकाकत राहिला आणि मग सलाईनच्या नळीतून त्याच्या शरीरात सोडलेल्या विविध औषधांनी त्याच्या मेंदूवर हल्ला केला आणि तो शुद्ध हरपून गाढ झोपेत पुन्हा बुडून गेला.

दुसऱ्या दिवशी विशाखाचं शरीर सापडलं. दरीत मरून पडलेली होती ती. पाठीवर हॅवरसॅक बांधलेली होती. चकचकीत स्टील फ्रेमची. फ्लूरोसेंट हिरव्या रंगाची. मेड इन ऑस्ट्रेलिया! तिचे आई-बाप ऑस्ट्रेलियातून यायला निघाले. मानसी सावध झाली. तिनं आपलं, आपल्या वडिलाचं वजन वापरून प्रकरणाची फारशी प्रसिद्धी होऊ दिली नाही. गिरीश तिसऱ्या दिवशीच ठीक होऊन हॉस्पिटलमधून घरी आला. मानसी व तो यांनी खरं काय ते निदान तिच्या आईवडिलांना सांगावं असं ठरवलं. त्याप्रमाणे गिरीशनं आपल्याला जेवढं आठवत होतं तेवढं सांगितलं. तिचे वडील देखील चांगले इंडस्ट्रिॲलिस्ट होते. त्यांना देखील या प्रकरणाची प्रसिद्धी नकोच होती.

''ती फार हट्टी होती,''

ते गिरीश-मानसीला म्हणाले, ''तुम्ही मुळीच अपराधी वाटून घेऊ नका.''

''हो,'' मानसी म्हणाली,

''मला तर खात्री आहे की ती उडी मारायला गेली आणि गिरीश तिला अडवायला गेला. अन् तिच्याबरोबर ओढला जाऊन, पाय घसरून तोदेखील पडला.''

आणि हेच स्पष्टीकरण सगळ्या घटनांना फिट्ट बसत होतं, चपखल बसत होतं. पोलिसांनी गिरीशचा उल्लेखच टाळून ''ट्रेकिंग करतांना झालेला अपघाती मृत्यू'' अशा प्रकारची काहीतरी नोंद करून विशाखा खंडाळ्याजवळ एकटीच ट्रेकिंग करत असतांना अपघात होऊन त्यात तिचा मृत्यू झाला, अशा माहितीनिशी ती केस बंद करून टाकली. विशाखाचे आई-वडील तिचा अंत्यसंस्कार भारतातच करून ऑस्ट्रेलियाला परतले.

मग मानसीला ज्या वेगळ्याच संकटाला तोंड द्यायचं होतं ते सुरू झालं. गिरीश व्यसनाधीन झाला होता. तो कोकेन घेत होता, हे तो हॉस्पिटलमधे असतांना डॉक्टरांना समजलं होतं आणि त्यांनी ते मानसीला सांगितलं होतं. मानसीनं आणि गिरीशच्या एका सायकिॲट्रिस्ट मित्रानं त्याला याबाबतीत चांगलं तासल्यावर तो कबूल झाला. तोपर्यंत घरातच असल्यानं त्याचे काही

विड्रॉल सिम्टम्स सुरू झाले होतेच. गिरीशनं मग आपल्या एक्स्टसीच्या अनुभवाविषयी सुद्धा काहीही न लपवता सरळ सरळ सगळी कबूली देऊन टाकली. मग एक लांबलचक ट्रीटमेंट अन रीहॅबिलिटेशन! पण सुदैवानं गिरीशनं फक्त सुरुवात ती काय केली होती. व्यसनात फार खोल तो बुडाला नव्हता. त्यामुळे तो पाचसहा महिन्यातच बरा झाला. पण त्यानंतर त्याचं चित्रं रंगवण्यातलं स्वारस्यच नाहीसं झाल्यासारखं झालं. काही ठिकाणी तो सन्माननीय निमंत्रित प्रोफेसर म्हणून फाईन आर्टस्च्या कॉलेजांमधे जात राहिला, एवढंचं! त्यानंतर त्यानं दरीत खोल डोकावून पाहिल्यासारखी पंचेचाळीस लँडस्केप्स काढली, तेवढंच काय ते त्याचं नवीन काम होतं. ते देखील नेहमीचं त्याचं ऑईलपेंटचं माध्यम सोडून त्यानं ती सिरीज वॉटर कलरमधे केली होती. त्याला नवीन चित्र न काढल्यानं डिप्रेशन यायला लागलं होतं!

आणि आता ती पंचेचाळीस चित्रांची मालिका ज्या चित्रावरून सुरू झाली त्या दरीत खोल डोकावून पाहिल्याच्या शेहेचाळीसाव्या पहिल्या मूळ चित्राकडे तो पहात बसला होता! त्याला विजयी झाल्यासारखं वाटत होतं! त्याची सिरीज आता प्रदर्शनात मांडली जाणार होती. त्याच्यावर लादला गेलेला विशाखाचा शाप संपला होता. पण एवढ्यात पुन्हा त्याला भास झाला, की त्या चित्रातल्या खोल दरीतून अस्पष्ट आवाजांची कुजबूज वर वर येते, त्यांला अंधुक ऐकू येतेय.

तिथे! तिथे जायचंय तुला !

त्याला पुसटशी जाणीव होती की त्याला हा भास होत होता. हे कोकेन-एक्स्टसी किंवा इतर कुठेलही ड्रग्ज न घेतल्याचे विड्रॉल सिम्टम्स होते.

त्यानं ते चित्र. भराभरा परत कापडात गुंडाळलं, शिडीवर चढून माळ्यावर टाकून दिलं, आणि ॲल्युमिनियमच्या त्या शिडीची घडी करून त्यानं त्या बाजूला असलेल्या छोट्या स्टोअर रुममध्ये टाकली आणि तो स्टुडिओमधे आपल्या सोफावर धापा टाकत बसला. कुठून तरी कोकेन मिळवावं, ते स्निफ करावं अशी अगदी तीव्र गरज त्याच्या शरीरातली पेशी अन् पेशी त्याच्या मेंदूला सांगायला लागली. त्याच्या शरीरात सगळीकडे ईमर्जन्सी बेल्स वाजायला लागल्या, सायरन्स गुंऽऽ गुंऽऽ करून घुमायला लागले. कसाबसा त्यानं स्वतःवर ताबा मिळवला. घरी जाऊन आपल्या सायकिॲट्रिस्टला फोन करावा असं त्यानं ठरवलं. एक ग्लास थंड पाणी पिऊन त्यानं अगदी हळू वेगानं श्वासोच्छ्वास करत अगदी लहान पावलं टाकत स्टुडिओतच शतपावली केली. पाचेक मिनिटं. मग तो बराच शांत झाला. त्यानं स्टुडिओ लॉक केला आणि तो कार घेऊन घरी निघाला.

एका लाल दिव्यापाशी बीआरटीच्या ओस पडलेल्या मोकळ्या रुंद रस्त्याच्या कडेला ट्रॅफिक जॅम मधे एकदा दिवा हिरवा होऊन पुन्हा लाल झाल्यावर दुसऱ्यांदा दिवा हिरवा होण्याची तो वाट पहात होता. एवढ्यात कायनेटिक वरची एक पुणेरी फूलनदेवी त्याच्या कारच्या खिडकीपाशी

थांबली. गिरीशला काचा बंद करून एसी सुरू ठेवायची पुण्यात फारशी गरज वाटायची नाही, अगदी उन्हाळ्यातली टळटळीत दुपार सोडून, अन् त्याला काचा बंद असल्या की क्लॉस्ट्रोफोबिक वाटायचं– गुदमरल्यासारखं वाटायचं. त्या खिडकी शेजारी थांबलेल्या फूलनदेवीनं तोंडावर बांधलेला रुमाल खाली खेचला. आपली मान नव्वद अंशात एकदम वळवून गिरीशकडे पाहिलं. आणि दात विचकून ती विचित्र स्वरात म्हणाली,

''तिथे! तिथे जायचंय तुला!'' त्यानं मान वळवून तिच्याकडे पाहिलं तर तिचा तोंडावर बांधलेला रुमाल तसाच होता, आणि ती शांतपणे दिवा हिरवा व्हायची वाट पहात होती. चौकातल्या रहदारीतच उन्हानं तापलेल्या रस्त्यावर एक उघड्या अंगाचा बरगड्या मोजता येतील असा लहान मुलगा आणि एक फ्रॉकमधली लहान मुलगी लोखंडाची दोन गोल कडी घेऊन त्यातून अशक्य वाटणारी सर्कस सहज करून दाखवत होती. एक ढेरपोट्या लठ्ठ पोलिस मठ्ठपणे रहदारीकडे पहात उभा होता.

दिवा अजूनही हिरवा का होत नाहीय? गिरीश मनातच चरफडला. कारच्या खिडकीपाशी सूर्यप्रकाशावर चालणारं चायनीज 'डिप ॲपल' विकणारा एक पोरगा आला.

गिरीशला डिप ॲपल दाखवून त्यानं दात विचकले, अन् अगदी स्पष्टपणे तो म्हणाला,

''तिथे! तिथे जायचंय तुला !''

गिरीशनं स्टिअरींगवरचे हात काढून चेहरा दोन्ही हातात लपवला. हातांनी डोळे चोळले. त्यानं हात पुन्हा स्टिअरींगवर ठेवले तर दिवा हिरवा झाला. सुटकेचा निश्वास टाकून त्यानं गाडी सिग्नलला डावीकडे वळवली. आता घर जवळच आलं होतं. फूटपाथवर राडारोडा पडलेला असल्यानं एकजण रस्त्यावरून हातात एक कागद घेऊन रस्त्याच्या कडेच्या बिल्डींगांची नावं वाचत – पत्ता शोधत असावा बहुतेक– चालला होता, तो गिरीशच्या कारला जवळ जवळ धडकलाच. मग गिरीश काही म्हणणार तर तोच,

''सॉरी हं !'' म्हणून त्यानं गिरीशच्या हातात तो पत्त्याचा कागद दिला – मिस्टर खंडागळे, ओशन सोसायटी, डीप बंगल्याजवळ – नाही, दीप बंगला असणार – आणि गिरीशलाच विचारलं –

''हा पत्ता कुठेय हो ?''

– बिबवेवाडी, लकी बेकरीमागे, पुणे ३७. गिरीशनं पत्ता पूर्ण वाचला. इथेच डावीकडे वळून लगेच तिसरी सोसायटी असं सांगायला त्यानं वर पाहिलं तर तो पत्ता विचारणारा त्याच्याकडे विचित्रपणे दात विचकून पहात होता, अन् तो म्हणाला,

''तिथे ! तिथे जायचंय तुला !''

गिरीश दचकला. त्याच्या हातून पत्त्याचा कागद सुटला आणि वाऱ्यावर भिरभिरत रस्त्याच्या कडेला पडला. तो माणूस ''अरे, अरे!'' करत तो कागद हस्तगत करायला त्याच्यामागे धावला.

गिरीशनं स्टिअरींग घट्ट पकडलं. मनाशी काहीतरी ठरवलं. आणि घराकडे वळण्याऐवजी तो यू –टर्न घेऊन जुन्या पुणे–मुंबई रस्त्याकडे निघाला. खंडाळ्याकडे!

तिथे!

तो तिथे निघाला होता!

******

त्या दोन झाडांमधल्या लहानशा जागेतून गिरीश पलीकडे गेला आणि त्या त्यांच्या गुप्त, सपाट लहानशा गवताळ मैदानावर बाहेर निघाला. दरीतून हवा वर वाहत होती आणि त्याच्या अंगावर भीतीची एक शिरशिरी उमटली. स्टीलच्या चकाकत्या फ्रेमची, फ्लूरोसंट हिरव्या रंगाची हॅवरसॅक पाठीवर स्ट्रॅप केलेली विशाखा – हो विशाखाच होती ती – त्या मैदानाच्या अगदी कडेला उभे राहून हुंदके देत होती. कड्यावरून खाली दरीत पहात. एकाएकी सगळं दृश्य झळाळल्यासारखं झालं. गिरीशची स्मरणशक्ती अचानक पूर्णपणे परत आली. त्याला तो बेशुद्ध पडण्याआधी त्या कड्यावर घडलेल्या घटना डोळ्यांसमोर दिसायला लागल्या – आठवायला लागल्या. अगदी क्षणार्धात त्याला सगळ्या घटना लखलखीतपणे आठवल्या.

अशीच विशाखा हुंदके देत उभी होती. तिच्या त्या 'तुझ्या त्या मानसीला' या शब्दांमधला धगधगीत विखार गिरीशला जाणवत होता. त्याच्या मनात एक विचार चकमला आणि तो झपकन पुढे झाला. त्याचं आणि मानसीचं जीवन उध्वस्त करायला निघाली होती ती! ते देखील तो अगदी आपल्या स्वप्नाच्या जवळ पोहोचत असतांना! विशाखा आडमुठेपणा करत होती. तिला मार्गातून हटवायलाच पाहिजे होतं.

विशाखाला काही समजायच्या आत तो तिच्या मागे पोहोचला देखील होता. दोन्ही हातांनी त्या हॅवरसॅकवर त्यानं जोर लावून ढकललं. विशाखा कड्यावरून पुढे फेकली गेली आणि खाली दरीत कोसळली. ''गिरीऽऽश!'' तिची आकांताची, आश्चर्याची किंकाळी दरीत विरळ होत गेली. आणि मग काही क्षणांनी ती दरीत जमिनीवर आदळली तेव्हाची तिची किंकाळी वर वाहणाऱ्या वाऱ्याबरोबर अस्पष्टशी ऐकू आली. नंतर वर भणाणणाऱ्या वाऱ्याचा आवाज सोडल्यास शांतता होती. आता त्याला काहीच करायचं नव्हतं, गिरीश मनाशी विचार करत होता – कार घेऊन स्टूडिओत किंवा घरी जाऊन बसायचं होतं. त्याचा या घटनेशी संबंध कुणी जोडूच शकत नव्हतं.

पण त्याचा पाय तिथून निघेना. जाड लोखंडी साखळदंडांनी पाय जखडून ठेवल्यासारखा तो तिथेच उभा राहिला. विशाखा बरोबरचे विविधरंगी संभोग आणि ड्रग्जच्या अनुभवलेल्या इंटेन्स ट्रिप्स त्याच्या मेंदूत कॅलायडोस्कोप फिरवल्यासारख्या तुकड्या तुकड्यांनी नाचत होत्या. काय घडलं होतं हे त्याच्या हातून? कोण होता तो? खुनी? तो एक खुनी होता! आणि तरीही त्याला अजून आपलं उरलं सुरलं ढोंगी, रटाळ जीवन वाचवण्याची आस होती. गांडुळासारखं वळवळणारं कणाहीन जीवन ! त्याला स्वतःचीच किळस आली. मग तो उलटा वळला. धावत धावत त्या मैदानाच्या कडेला गेला आणि जमीन संपली तरी त्या कड्यावरून पुढे धावत त्यानं उडी टाकली. मरण्यासाठी, प्रायश्चित्तासाठी.

पण एका झुडुपात अडकून त्याची गती रोखली गेली थोडासा खाली गडगडून त्याचं डोकं एका दगडावर आपटलं आणि तो बेशुद्ध झाला. तो हॉस्पिटलमधे होता आणि मानसी त्याच्या शेजारी बसलेली होती.

*******

एखाद्या चित्रपटात फ्लॅशबॅक पाहिल्यासारख्या गिरीशला त्या दिवशीच्या सगळ्या घटना आठवल्या अगदी स्पष्टपणे. अन् त्याचा स्वतःशी सामना झाला. भ्याड! कुत्रा! कृतघ्न! हरामखोर! खुनी! खुनी होता तो!

तो काचेच्या डोळ्यांनी समोर पहात राहिला. मग एक आश्चर्य घडलं. कडेला असलेल्या झाडांच्या फांद्या उंच पसरलेल्या होत्या. त्या काळ्या फांद्यांच्या मधल्या मोकळ्या जागांमधे त्याला प्रथमच तिचा चेहरा दिसला. विशाखाचा. छाया प्रकाशाच्या खेळामुळे त्यासमोर दिसणाऱ्या झाडीतल्या रिकाम्या जागा त्याला हुबेहुब विशाखाच्या चेहऱ्यासारख्या दिसत होत्या ! तो अवाक् होऊन पहात राहिला.

वाऱ्यानं दोन फांद्या किंचित हलल्या आणि विशाखाचे ओठ हलल्यासारखे झाले. मनाच्या अगदी खोल तळातून उमटल्यासारखी विशाखाची ती कुजबूज त्याला ऐकू आली.

तिथे! तिथे जायचंय तुला!

त्याच्या मेंदूभोवती निस्तब्ध शांततेचा एक कोष विणला गेला. तो दरीच्या दिशेनं, त्या लहानशा मैदानाच्या कडेच्या दिशेनं वेड्यासारखा वेगानं धावत निघाला. पायाखालची जमीन संपून गेली पण त्यानं वेग कमी केला नाही. यावेळी त्यानं मागल्या वेळेसारखा कड्याच्या अगदी टोकाला घाबरून पाय आखडता घेतला नाही.

जमीनीचा आधार सुटताच त्याला पूर्ण स्वातंत्र्य जाणवलं. त्यानं खाली पाहिलं तसं ते दरीत डोकावून पाहण्याचं दृश्य त्याला ओळखीचं वाटलं. मागच्या वेळी त्यानं उडी मारली तेव्हा देखील दरीत वाकून पडतानाचं हेच दृश्य त्याला दिसलं होतं. ते त्याच्या मेंदूत स्पष्ट रेखलं गेलं होतं. म्हणूनच नंतर त्यानं त्या दरीत कोसळत असतांनाच्या दृश्याची लँडस्केप्सची सिरीज केलेली होती. अन आता त्या चित्राचं न्यूयॉर्कमधे प्रदर्शन.... मानसीची स्वप्नं... सगळं अगदी पूर्णत्त्वाला येत आलेलं ... आणि ते सगळं टाकून देऊन ... त्यानं ही स्वत:च्या विनाशाकडे उडी घेतली होती. विशाखाच्या आठवणीनं...का तिच्या आत्म्यानं??... का त्याच्या अपराधी भावनेनं???... त्याला ही उडी घ्यायला भाग पाडलं होतं...

जमीन प्रचंड वेगानं जवळ येतांना त्याला दिसली. अन् काही कळायच्या आतच त्या दगड धोंड्यावर आपटून तो एखाद्या पिकलेल्या फळासारखा फुटला. त्याची जीवघेणी किंकाळी हवेवर तरंगत वर अस्पष्टपणे पोहोचली.

आणि मग दरीतून भणाणत वर जाणाऱ्या वाऱ्याचा आवाज सोडल्यास तिथे निस्तब्ध शांतता उरली.

त्या दरीच्या तळाशी.

# तिथे!

******

**सगळीकडे** विचित्र गोंधळाचं धुकं घनदाट अस्ताव्यस्त सैरावैरा पसारा बोकाळल्यासारखं इकडेतिकडे सगळीकडे स्फोटून मेंदूतून कवटी फोडून निघाल्यासारख्या स्फोटांनी सर्वत्र पसरणारं. मध्यबिंदू कोणता? गुरुत्वमध्य कोणता? विश्वाचा गुरुत्वमध्य, वैश्विक मन. चारदोन आकाशगंगांना तुमच्या बापजाद्यांची अन् दोनचारशे नक्षत्रांना तुमच्या पूर्वजांची नावे दिली म्हणजे लई भारी झालात का तुम्ही लोक? ग्रेट लेकाचे! असा सगळा गोंधळ डोक्यात धुकं माजवीत असताना त्याचे डोळे हळूहळू उघडले आणि त्याला कमी पॉवरच्या निळसर सी.एफ.एल. प्रकाशात दोनचार हिरवे रेडियमचे लकाकते डोळे दिसले. त्यानं जरा हालचाल केली तर त्याला जाणवले त्याच्या दोन्ही हातांच्या बोटांना लावलेले प्लास्टिकचे चिमटे. डाव्या हाताच्या तर्जनीला आणि उजव्या हाताच्या तर्जनीला जोडलेल्या चिमट्यांमध्ये दोन दिवे काजव्यांसारखे लुकलुकणारे. एल.ई.डी. लाइट एमिटिंग डायोड. प्रकाशदायक व्दिध्रुवीय.

म्हणजे हॉस्पिटल होतं. रुग्णालय. म्हणजे ॲक्सिडेंट होता. अपघात. आधीच्या वेळी काय होतं बरं? भपकन सगळा अंधार निळाई रेडियम वगैरे विझले आणि सूर्याचा पिवळा धमक उजेड वाळवंटात हळूहळू पांढरा शुभ्र, तीव्र अतिउष्ण प्रकाश बनला. डोळ्यांनाच काय, सगळ्याच ज्ञानेंद्रियांना आंधळं करून टाकणारा.

काळे दोनतीन ठिपके खूप दूर लहानशा वर्तुळात फिरणारे. ते जवळ आल्यावर वर्तुळ मोठं. तीन एकूण. आणखी जवळ. अच्छा ! गिधाडं! मग शेवटी हाडांचा पांढरा स्वच्छ सापळा राहिला नाही का? पण मग अजून तो अडकून कसा होता? सूडाच्या इच्छेमुळे? इन्स्पेक्टर हनुमंत डांगे! हाडांमध्ये देखील स्मरणशक्ती असते? कवटीमध्ये? मग विश्वाचा गुरुत्वमध्य कुठे असतो? आणि विश्व तो गुरुत्वमध्य कसं संभाळतं?

एक गंभीर आवाज आला : तो गुरुत्वमध्य अवकाश व काळ यांच्याही पल्याड असतो. अवकाश-काल-सापेक्ष नसतो. त्याबरोबर तेजस्वी रखरखीत सूर्य खेचल्यासारखा खाली

जाऊन मावळला. कालाचा सापेक्ष वेग जणू खूप वाढला आणि रात्र होऊन त्या वाळवंटातल्या जीवघेण्या थंडीत बेवारस पडलेला तो हाडांचा सापळा थंडीत थडथडत राहिला. ती कवटी दात किटकिटवीत राहिली.

मग सर्वभर सगळीकडे सगळं काही व्यापून राहिलं. कालाचा एकही क्षणांश सुट्टा नाही, ना अवकाशाचा बिंदुमात्र. सगळा एकसंध परमेश्वर. सगळाच त्याचा सर्वभर सगळीकडे सदासर्वदा भरून राहिलेला आत्मा. सगळा तोच. किंवा तीच. किंवा मीच. किंवा तूच. सगळं एकसंधच. आत्मा. परमात्मा. वैश्विक आत्मा. विश्वात्मा. कसं वर्णन करणार? अशक्यच ना! नेति नेति!

रेडियमचे हिरवे डोळे लखलखत होते. अंधारात. अतिदक्षता विभागातल्या मधल्या बेटातून परिचारिका बाहेर आल्याचं त्यानं पाहिलं. तिनं सर्व ऊर्जा वाचवणारे फिकट दिवे भिंतीवरच्या कळा भराभर दाबून बंद केले. पहाटेच्या राखाडी प्रकाश हळूहळू सोनेरी होत होता. अतिदक्षता विभाग – तळमजल्यावरच असावा. त्याच्या पलंगाशेजारच्या खिडकीच्या तावदानातून रातराणीचा वेल दिसायचा. पण तावदान सतत बंद. वातानुकूलनामुळे. त्याची औषधांची गुंगी उतरत होती आणि आपण बेशुद्ध पडून अतिदक्षता विभागात धावपळ करून आणले गेल्याची आठवण स्पष्ट होत होती. तो मरत होता का?

''हॉ हॉ हॉ हॉ!'' राजा गडगडून हसला.

''यू आर ग्रेट हं! मराठी बोलताना एकही इंग्लिश आयाम – सॉरी – मी दुःखी आहे – इंग्लिश नव्हे, इंग्रजी! – तर मराठी बोलताना एकही इंग्रजी शब्द वापरीत नाहीस तू! घर बाकी मस्त सजवलंय!''

''तो तिचा विभाग!''

''ओ होऽऽ! वा, वहिनी! फारच छान!''

''लग्नाआधी मी अंतर्गत सजावटीचा अभ्यासक्रम केला होता!'' त्याच्या बायकोचा – अंजनीचा आवाज!

''ओ हो ! सगळ्या फ्यामिलीला – सगळ्या कुटुंबाला मराठी बोलणं सक्तीचं केलंयस काय रे? हुकूमशहा?? हिटलर?''

''नाही रे ! मी फक्त इंग्रजी शब्द कुणी वापरला की दुरुस्ती करून मराठी शब्द सुचवतो! मग आपोआप लोक शुद्ध बोलायला लागतात!''

अंजनी आत अल्पोपहार आणि चहा बनवायला गेली.

''भाडखाऊ!'', त्याचा दोस्त राजा म्हणाला, ''मूर्ख आहेस तू! इंग्लिश का टिकून आहे अन् जगभर का पसरतंय हळूहळू माहीत आहे?''

''बंदुकीच्या, संपत्तीच्या, अण्वस्त्रांच्या जोरावर.''

''नाही. ती तुझी थिअरी आहे मला माहीत; पण ती चुकीची आहे.''

''मग?''

''कारण इंग्लिश भाषा ही रांड आहे रांड! ती शुद्धतेचा कोता विचार करीत नाही ती इतर सर्व भाषांमधले शब्द आपल्यात घालून घेते! त्यामुळे ती सतत विस्तार पावत असते. शुद्धतेचा आग्रह धरणाऱ्या भाषा आक्रसत जाऊन नष्ट होतात. कुठल्याही इतर भाषेतला शब्द म्हणजे काही रोगजंतू नसतो, की तो आपल्या भाषेत आला तर आपली भाषा आजारी पडेल! उलट तो शब्द आहे तसा आपल्या भाषेत घेतला तर आपली भाषा फोफावते!''

पण त्याला त्याच्या मित्राचं – राजाचं म्हणणं पटलं नव्हतं.

''तसंच काही नाही. संस्कृत ही इतकी समृद्ध भाषा आहे की मानवी प्रगती कितीही झाली, कितीही नवीन उपकरणं शोधली गेली तरी त्यांच्या कार्याप्रमाणं शुद्ध संस्कृत, आणि त्यावरून शुद्ध मराठी शब्द करता येतीलच तयार!''

''हो ! शब्दकोषांमध्ये धूळ खात पडून राहण्यासाठी! अग्निरथ विश्रामागमनसूचक लोहतूलिका! हाः हाः हाः हाः! अन् किती जणांना बोलताना तू 'तुमचा भ्रमणभाष क्रमांक जरा देता का?' म्हणताना ऐकलंय्स? सगळे जण 'मिस्कॉल द्या, म्हणजे तुमचा मोबाइल नंबर माझ्याकडे सेव्ह करतो' असंच म्हणतात ना?''

तेवढ्यात अंजनी चहा-अल्पोपाहार घेऊन बाहेर आलीच होती. राजाच्या स्तुतीनं अजूनही सुखावलेली! घराच्या अंतर्गत सजावटीत तिनं अगदी जीव ओतला होता!

''माहितीय? सगळं फर्निचरसुद्धा मी स्वतः कल्पना करून सुतारांना सांगितलं बनवायला. अगदी कागदावर आकृत्या काढून.''

राजाला चहा पिता पिता ठसका लागला.

''फर्निचर?'' राजा म्हणाला. मग 'फर्निचर' साठी मराठी प्रतिशब्द धुंडाळण्यासाठी सगळे कोष पालथे घातले; पण सापडला नाही. मग एकदा महाराष्ट्र जलदगती गाडीनं नागपूरला

जाताना चंद्रपूर स्थानकाआधी थांबण्याचा इशारा मिळाल्यानं गाडी गतिरोधकाचा कर्रर्र कचर्रर्र आवाज करत जाऊन हळूहळू थांबली, ती बरोबर पत्र्याच्या एका टपरीसमोर. अन् त्यावर पाटी 'उपस्कर विभाग' – अन् खाली 'फर्निचर डिव्हिजन' – ओहो! फर्निचरला हिंदी म्हणा – संस्कृत म्हणा – उपस्कर शब्द होता तर! मराठीत देखील तोच वापरता येईल.

दिवसपाळीची परिचारिका आली. रात्रपाळीची तिच्याबरोबर थोडी थट्टामस्करी करून गेली. त्याच्या खांद्यातला वेदनांचा लोळ उष्ण होऊन मेंदूत जाणवायला लागला. स्वतःच्या नकळतच तो जोरजोरात कण्हायला लागला. त्याला अपघात झाला होता का?– दिवसपाळीच्या परिचारिकेनं त्याचा पलंग क्रमांक पाहून त्याच्या तक्त्यावरची नोंद पाहिली. सुईनं त्याच्या हाताला जोडलेल्या ग्राहक नळीत वेदनाशामक द्रव मिसळला. दोन क्षणांतच त्याच्या रक्तात तो मिसळला गेला आणि त्याच्या वेदना विरघळून जाऊन त्याला गुंगी यायला लागली. अंजनी शेवटी त्याच्या हुकुमशाहीला कंटाळल्याची आणि न्यायालयातल्या घटस्फोटाच्या प्रक्रियतेल्या वादविवादाची दृश्यं त्याच्या आठवणींच्या पृष्ठभागावर तरंगत वर येत असतानाच त्याच्या रक्तात मिसळलेल्या निर्जीव औषधांनी त्याच्या सजीव मेंदूचा पूर्ण ताबा घेतला आणि तो संपूर्ण बेशुद्धीत सखोल बुडून गेला.

हे सगळे वेगवेगळे पुनर्जनम होते का ? ''समझदार को इशारा काफी है।'' हे अमीनाचं वाक्य ऐकून सुधीर दोन मिनिटांतच आपला लॅपटॉप वगैरे आवरून, लॅपटॉपच्या चार्जरचा प्लग काढून लॅपटॉप बॅगेत पॅक करून, ''ओके. मला जायलाच पाहिजे अगदी!'' म्हणून निघाला, आणि मग रूमवर – तो आणि अमीना दोघंच राहिली. सुधीरनं जरा जोरातच आपटलेल्या लॅचचं दार बंद होऊन थरथरत असतानाच तो दाराशी गेला आणि त्यानं वरचा उभा बोल्ट घट्ट लावून दार अगदी सुरक्षित बंद केलं. तो पलंगावर बसला तेव्हा त्याच्या समोरच्या खुर्चीत अमीना आता लाजून चेहरा हातात लपवून बसली होती. त्यानं तिचे हात तिच्या चेहऱ्यावरून बाजूला केले आणि तिला आपल्याकडे ओढलं. ती सहजपणं ओढली गेली आणि त्याच्या डाव्या मांडीवर बसली. तिच्या केसांवर किंचित सोनेरी छटा होती आणि तिचे डोळे निळे होते. ती काश्मीरहून इथे शिकायला आली होती. तिच्याशी नजरानजर होताच झर्रकन तिच्या अगदी चेहऱ्यापर्यंत रक्त चढलं आणि ती लाजून लाल झाली, आणि तिचे दोन्ही गाल आपल्या तळव्यांमध्ये दाबून धरत तिचा चेहरा वर करून त्यानं तिचे ओठ अधाशीपणं आपल्या ओठात घेतले. तिचे हात त्याच्या गळ्याभोवती आवळले जाऊन ती त्याच्या मांडीवर आणखीनच त्याच्याकडे सरकली. तिची गोरी–गुलाबी कांती पाहून त्याला नेहमी तो यूकेमध्ये दोन वर्ष होता, त्या काळातल्या त्याच्या तीन ब्रिटीश मैत्रिणी आठवायच्या. विशेषतः क्लारा. खूप साम्य होतं दोघींमध्ये. त्यानं तिचे ओठ आपल्या जिभेनं विलग करून जीभ आत सारताच तिची गळामिठी आणखीनच घट्ट झाली आणि चार दिवसांपूर्वी अडखळत तिनं त्याला सांगितलं होतं – सर, मला तुमच्याबरोबर पहिला अनुभव घ्यायचाय. तुमच्याकडून शिकायचंय – ते आठवून तो अतिशय उत्तेजित झाला.

शेवटी दोघंही कपडे फेकून नग्न झाली. तेव्हा नशील्या निळ्या, अर्ध्यामिटल्या, जड पापण्यांच्या डोळ्यांनी त्याच्याकडे पाहणाऱ्या अमीनाच्या शरीरावर तो झुकला आणि गुडघे उंच करून वेगळावलेल्या तिच्या मांड्यांच्या मध्ये त्यानं आपल्या उजव्या हातानं तिला पूर्ण झाकून स्पर्श केला. इतका मऊ रेशमी स्पर्श त्यानं कधी अनुभवलाच नव्हता. नुकत्याच इस्त्री केलेल्या दाट मखमली वस्त्रासारखा उष्ण स्पर्श. लंडनच्या त्याच्या अपार्टमेंटमध्ये तळमजल्यावरच्या लाँड्रोमॅटच्या ड्रॉवरमधून बाहेर इजिप्शिअन कॉटनच्या अतिशय महागड्या टर्किश टॉवेलचा स्पर्श. पण त्यापेक्षाही मोहक. वेडावून टाकणारा. संमोहित करणारा. खूप वेळ आपला तळवा फिरवून तो नुसता तिचा स्पर्श अनुभवीत राहिला. मग न राहवून तिनं त्याला आपल्यावर ओढून घेतलं तेव्हा तो भानावर आला. त्यानं दोन्ही हातांनी तिचे स्तन ताब्यात घेतले आणि तिची किंकाळी बाहेर फुटू नये म्हणून तिचे ओठ आपल्या तोंडात घेऊन तिचं तोंड बंद केलं. मग तिच्या छातीवरचे हात दंडांवर, मग हातांवर सरकवीत तो तिच्यावर झुकत गेला. तिच्या दोन्ही पंजांमध्ये आपली बोटं गुंफून त्यानं तिचे हात तिच्या डोक्याच्याही वर ताणून गादीवर दाबून धरले आणि तिच्या वेगळावलेल्या मांड्यांमध्ये आपले गुडघे टेकून तिचे ओठ आपल्या तोंडात आणखीनच ओढून घेत त्यानं त्या नाट्याचा पहिला प्रयोग, अंक एक, पहिला प्रवेश सुरू केला.

एकाएकी बाण खोल घुसलेल्या हरिणीसारखी ती छटपटली तरी त्यानं दयामाया न दाखवता समाधानानं तिचा मांसल, जाड ओठ दातांमध्ये कचकन् जोरात चावून धरला आणि तिच्या ओठातून येणारं आंबुस, पातळ रक्त तो चोखत राहिला. तिचं ताठरलेलं शरीर एकाएकी शिथिल झालं आणि त्याला आपल्यात खोलवर शिरताना अनुभवल्यामुळं तिनं सुटकेचा, कल्पनातीत सुखाचा एक दीर्घ उसासा सोडला.

एकदम काहीतरी खेचल्यासारखा त्याच्या दोन मांड्यांच्या मध्ये वेदनांचा लोळ उठला, अन् रासायनिक गुंगीतून तो त्या वेदना सहन करताना शुद्धीवर आला. नर्स त्याच्या शिश्नाच्या लघवीच्या छिद्रातून जुना कॅथेटर निष्काळजीपणे खेचून काढत होती. मग नवीन कॅथेटर तिथेच पुन्हा खुपसून त्याला नवीन लघवीची पिशवी लावताना पुन्हा वेदनांचं मोहोळ त्याच्या मांड्यामध्ये फुटलं अन् घोंघावत पाठीच्या कण्यातून वर चढायला लागलं.

''मी पंच्याहत्तरपासून लिहितोय. पण त्या मानानं प्रसिद्धी शून्य!''

''हो, पण तू ते पोर्नोग्राफिक लिहितोस सगळं. ते ॲक्सेप्ट करायची अन् त्याला चांगलं समजायची हिंमत नसते – आपल्या सदाशिव पेठी मराठी वाङ्मय संस्कृतीत.''

''का बरं ? मराठेची काळेशार पाणी, निष्पर्ण वृक्षावर – त्यावेळी बरी ॲक्सेप्ट झाली ती पुस्तकं – शिवाय वासूनाका, केसाळ काळंभोर, पिल्लू वगैरे!''

''शूऽऽ! हळू बोल! त्याला नंतर नंतर तुकारामबुवा मानायचे! अगदी त्याच्या वैकुंठ गमनापर्यंत!''

''हो ना, पण मराठी वाङ्मय वयात येत असताना मध्येच हा सगळा सोवळेपणा त्यात शिरून ते तरुण न होताच डायरेक्ट म्हातारं कसं झालं?''

''माझी तर अशी थिअरी आहे, की याला काँग्रेस जबाबदार आहे.''

''कसं काय?''

''आणीबाणीच्या वेळी आणि नंतर देखील प्रचंड आर्थिक घोटाळ्यांवरून जनतेचं लक्ष हटवण्यासाठी ते श्लील-अश्लील वाद निर्माण करायचे! नेहमीचंच आहे हे! आणि मी तुला मागं जागतिक सेन्सॉरशिपच्या इतिहासाचं पुस्तक दिलं होतं ना, त्यात तर जगातली सगळी सरकारं हे करतात याचे पुरावे दिले आहेत. इतकंच काय, मला तर खात्री आहे, की परवा त्या हूप्पमुख्खमंत्र्यानं तोंडातून यूरीनची पिंक टाकली त्यामागं एखादा प्रचंड मोठा स्कॅम लपवणं हाच हेतू असणार!''

''हं!''

''पण खरं तर हे सगळं त्याच्याही आधीपासूनचं आहे. संस्कृतमध्ये शृंगाराला नवरसांचा राजा मानलंय! अन् संस्कृतमधल्या अप्रतिम शृंगारिक साहित्याचा एकशतांश भाग पण आपणाला माहीत नाही. आधी मुस्लिम आणि मग व्हिक्टोरियन मॉरॅलिटीचे ब्रिटीश, यांच्या जवळजवळ चार-पाचशे वर्षांच्या जुलूमाखाली आपल्या भाषांमधल्या साहित्यातला शृंगाररस वाळूनच गेला! कारण या दोन्ही होत्या पडदानशीन संस्कृत्या! स्त्रियांना दुय्यम, आपल्या मालकीच्या वस्तू समजून त्यांना चेहरा दाखवायची पण मनाई करणाऱ्या! सध्या दिल्लीत अन् देशभर जे चाललंय, ती सगळी या भावना चार-पाचशे वर्षं दडपून टाकल्याचीच रिॲक्शन आहे!''

''हं!''

''अन् मग एकदा राज्यकर्त्यांची पडदानशीन संस्कृती जेत्यांची संस्कृती ठरल्यावर आपल्या बामणांनी पण साहित्याचं फार नुकसान केलं. सगळे संस्कृत ग्रंथ, शृंगारिक असोत किंवा नसोत, बासनातच बांधून ठेवले!''

''ते तर बामणांचं मनूपासूनचं धोरण आहे. समाजात फक्त आपलंच वर्चस्व राहावं म्हणून!''

''हो, तेही , खरंच म्हणा! च्यायलाऽऽ! काय बकबक लावलीयस! चल, ग्लास खाली कर अन् ती जगतीत-चित्राची कॅसेट उलटी करून लाव!''

त्यानं घोट घेतला. कडवट स्कॉच चवदार लागली. त्यानं कॅसेट प्लेअरचं बटन दाबलं. त्याला त्याच्या जुन्या कॅसेटच बऱ्या वाटायच्या सीडीपेक्षा. चित्रा आपल्या उंच, टोकदार आवाजात गायला लागली.

''दर्द बढकर फुहा न हो जाये

ये जमीं आसमाँ न हो जाये....''

त्याच्या आठवणीतली ही पार्टी वेदनाशामक औषधांच्या गुंगीत विरघळून जायला लागली. नर्सनं त्याची रिकामी सलाइनची बाटली काढून तिथे नवीन बाटली उलटी टांगली. बेशुद्धीत बुडताबुडता त्याला भाऊसाहेब पाटणकरांचा राजेश खन्नाच्या मृत्यूनंतरचा शेर आठवलाः

स्कॉचची बाटली उलटी टांगून माझ्या रक्तात सोडून म्हणा, 'चीअर्स!'

हे सलाईनचं मिठाचं पाणी काय कामाचं? पुष्पा, आय हेट टीअर्स!

वाहवाSS! वाहवाSS!

मग ती एक स्मृती जागृत झाली खोल कुठेतरी.

रश्मीला आईनं सगळं समजावून सांगितलं आणि तिनं ते आपल्याला आधी माहीत नसल्याचं नाटक करून समजावून घेतलं. खरं तर गेले दोन-तीन महिने ती उत्सुकतेनं या घटनेची वाट पाहत होती. कॉलेजातली तिची मैत्रीण रचना - तिचे 'चम्स' तर गेल्या वर्षीच सुरू झाले होते. सुरू झाल्याबरोबर भराभरा रश्मीची कांती तेजस्वी झाली, तिची फिगर भरायला लागली आणि कॉलेजातली मुलं तिच्याभोवती घोटाळायला लागली. तिला आपली छावी करण्याच्या प्रयत्नाला लागली. पण रश्मीनं कुणाला घास घातली नाही. तिचं लक्ष्य होता देवेंद्र शुक्ला अन् तिनं त्याच्याशी ओळख अगदी सहजपणं झाल्यासारखी वाढवली. अन् त्याच्या सगळ्या यूपी क्लाउडच्या हाय-फाय श्रीमंत कंपूमध्ये ती सहजतेनं वावरायला लागली. गुपचप देवेंद्रच्या आवडीनिवडींचा तिनं आर अँड डी केला आणि त्याच आवडीनिवडी आपल्याही असल्याचा बहाणा करून ती आठवडाभरातच त्याची स्टेडी बनली. रश्मीची आईच तिची सल्लागार होती. आईच्या सांगण्याप्रमाणं तिनं त्यांला चुंबना-आलिंगनापलीकडे अन् वरवरच्या 'कूची कू' पलीकडे जाऊ दिलं नाही. सारखा त्यानं आपल्या आईवडिलांना सांगावं असा धोशा लावला.

अन् रश्मीच्या आईचा पुरुष मानसशास्त्राचा अभ्यास अगदी बरोबर ठरला! जेव्हा पुरुष कडक असतो, तेव्हा तो स्त्रीच्या बाबतीत मऊ असतो, अन् जेव्हा तो मऊ होतो त्यावेळी तो स्त्रीच्या बाबतीत कडक असतो.

देवेंद्र रश्मीच्या प्रेमानं – किंवा तिला 'जिंकण्याच्या' इच्छेनं म्हणा – एवढा पछाडला गेला की तो तिच्या हातचं बाहुलं बनला! त्यानं आपल्या आईवडिलांना बोलावलं. त्यांची रश्मीच्या आई–वडिलांशी गाठ घालून दिली. देवेंद्रची आई तर फारच खूष झाली. कारण देवेंद्रच्या छचोर मैत्रिणी, त्यांचे ब्रेक–अप्स, त्यांची व्यसनं, या सगळ्यात तिनं देवेंद्रविषयी आशाच सोडली होती. अन् या रश्मीनं देवेंद्रला चक्क माणसात आणल्यासारखं केलेलं. मग काय बी.टेक. ची परीक्षा देऊन दोघेही लग्न करून मग कोलंबिया युनिर्व्हसिटीत एम.एस. करायला! पैसा सगळा देवेंद्रच्या वडिलांनी खर्च केलेला!

पण अमेरिकेतल्या त्या अनिर्बंध वातावरणात देवेंद्रचा स्वतःवर ताबा राहिला नाही. क्रिस्टल मेथ, कोकेन, एक्स्टसी – तो वाहवतच गेला. पण रश्मीला काही फारसं घेणं नव्हतं. तिनं देवेंद्रच्या वडिलांना अतिशय इमोशनल पत्रं लिहिली. देवेंद्रला त्याच्या वडिलांनी जबरदस्तीनं परत बोलावलं; पण तो जायला तयार नव्हता. रश्मी वेगळं अपार्टमेंट घेऊन राहायला लागली. स्कॉलरशिप मिळवून कोलंबियाला आलेल्या राहुल कुलकर्णीबरोबर तिची मैत्री वाढत गेली. अन् एका रात्री दरवाजावर खटखट झाली, तर राहुल आला असणार अशा समजुतीनं तिनं दार उघडलं, तर हातात छोटीशी चंदेरी बंदूक घेऊन दाढी वाढलेला लाल डोळ्यांचा देवेंद्र उभा! तिनं ओरडायला आ उघडायच्या आतच थाड थाड थाड तीन गोळ्या तिच्या छातीत मध्यभागी घुसल्या. आणखी दोन गोळ्या पोटात आणि ती रक्ताच्या थारोळ्यात पडत असतानाच उलटा वळून देवेंद्र धावत लिफ्टकडे गेला, तर लिफ्टचं दार उघडून राहुल बाहेर आला. देवेंद्रनं एक गोळी झाडली ती राहुलच्या दंडाला लागून गेली, पण राहुलनं झेप घेऊन देवेंद्रला पाडला. धावपळ, अँब्युलन्स, हॉस्पिटल, अत्याधुनिक यंत्रं, त्यांचे हिरवे–निळे चकाकते डोळे. मॉनिटर्सवर धावणाऱ्या वेव्ह्ज! रश्मीनं डोळे किलकिले केले. सर्व भिंती, जमीन, छत सर्व तिच्या सहा बाजूंनी चालून आलं आणि ती एका बिंदूत आकसून गेली. सगळे वेदनांचे लोळ शांत झाले. तिची स्वयंकेंद्रित जाणीव नाहीशी झाली. गुरुत्त्वाकर्षणाऐवजी गुरुत्त्वापसरण सुरू झालं. तिची जाणीव पसरत गेली. विरळ विरळ होत नाहीशी झाली. सगळीकडे.

ती मेली होती का ?

तिनं डोळे उघडले तेव्हा तिला चांगलं वाटत होतं. तिनं अभावितपणं मोकळा उजवा हात आपल्या दोन मांड्यांच्या मध्ये घातला. ती दचकली. ती पुरुष होती! नाही, नाही तो पुरुष होता! नाही नाही! त्याच्या आठवणी जाग्या होत होत्या. तो पुरुष होता. पण तो स्वतःला मध्येच स्त्री का समजायला लागला होता?

थकून त्याचे डोळे मिटले. पुन्हा स्वप्नं सुरू झाली. हे सगळे अनुभव इतक्या गडदपणे खरे वाटत होते. गुलाबाच्या पाकळ्या पलंगावर, मोगऱ्याच्या माळा, मच्छरदाणीऐवजी. हॉटेल एअरकंडिशंड. देवेंद्रला त्या खिदळणाऱ्या तरुणींच्या घोळक्यानं आत ढकललं. रश्मीला हे सगळं

स्वप्नच वाटत होतं. कौमार्य नावाच्या वीतभर कातडीच्या तुकड्याच्या मोबदल्यात तिनं हे सगळं मिळवलं होतं. तिच्या आईचं अगदी बरोबर होतं. देवेंद्र आत आला. ती उठून मान खाली घालून उभी राहिली. देवेंद्रनं तिच्या हनुवटीखाली बोट घालून तिचा चेहरा वर उचलायचा प्रयत्न केला. पण तिला असह्य अशा गुदगुल्या झाल्यानं ती एकदम अंग घुसळून हसली आणि तिच्या हाताच्या फटक्यानं त्यानं तिच्या अगदी तोंडाजवळ आणलेला चांदीचा प्याला फाडकन उडाला आणि त्या पंचतारांकित हॉटेलच्या कार्पेटमध्ये भराभरा ते केशरी दूध मुरुनसुद्धा गेलं. देवेंद्र अन् रश्मी खदखदून हसली. पण देवेंद्रनं तिला त्या फुलांच्या शेजेवर ढकलून तिच्या झुकून तिचं तोंडच बंद केलं.

शेवटी त्या सुख-वेदनांच्या मिश्र क्षणी रश्मी चकित झाली. अशा वेदना तिनं आधी कधीच भोगल्या नव्हत्या. आणि असं सुख देखील. जणू आपल्या आत्म्याला एक धक्का बसून तो आत्मा शरीराहून वेगळा झाल्यासारखी एक विलक्षण संवेदना तिनं अनुभवली. ती जणू आकाशात तरंगत होती आणि तिचं शरीर खाली पलंगावर राहिलेलं होतं. सुखाच्या एकेका लाटेबरोबर ती आणखी उंच उंच जात होती. मग एकाएकी वेगानं ती अवकाशातल्या अंधाऱ्या भोवऱ्यात ओढली गेली. घनदाट काळोख. अन् त्या काळोखात एक दार करवादत उघडलं गेलं अन् बंदुकीतून गोळ्या येऊन तिच्या छातीत, पोटात घुसल्या, धाऽड् धाऽड् धाऽड्. अर्धा क्षणच त्या जळत्या वेदना तिच्या शरीरात पसरल्या आणि ती निर्जीव होऊन कोसळली.

तो घामानं चिंब भिजून आता टकटकीत जागा झाला. रात्र होती. सी.एफ.एल. च्या निळाईतली आस.सी.यू.मधली कृत्रिम साधनांनी जिवंत ठेवलेली रात्र! कितवी रात्र असेल ही? आधी तो मोजायचा. चला, पाचवी रात्र झाली. आजचा दिवस खूप बरं वाटतंय. उद्यापर्यंत डिस्चार्ज मिळायला हरकत नाही. पण आता कळून चुकलं होतं की आपला मृत्यू आता जवळ आलाय. पण या सगळ्या आठवणी काय आहेत? त्यातल्या काही आठवणी स्त्रियांच्या देखील? म्हणजे तो स्वतः स्त्री आहे अशा आठवणी? आणि स्त्री-शरीराच्या संवेदना - जाणिवांच्या आठवणी? त्या कशा काय? एक गंभीर, मृदू आवाज म्हणाला, ''त्या तुझ्या वेगवेगळ्या जन्मांमधल्या स्मृती आहेत.''

ओहो! त्यानं विचार केला - आणि हे जे मधूनमधून गंभीर आवाज उपदेश करतात त्या श्रुती असाव्यात! त्याला बऱ्याच दिवसांनी ऑक्सिजन मास्कखाली का होईना, स्मित फुटलं! निदान तो मनातल्या मनात ओठ रुंद फाकवून मनसोक्त हसला! हे हिरवे लकाकणारे डोळे, ही निळाई, मधूनमधून त्या डाव्या कोपऱ्यातल्या मॉनिटरवर दिसणाऱ्या धावत्या रेघा हे सगळे रोज नियमित बदलणारे डॉक्टर, नर्स, वॉर्डबॉय यांचे नटसंच! हे सगळं कुठलं तरी पुराण असावं. मग काहीतरी विचार मनात येऊन त्याचं स्मित आणखीनच रुंदावलं. ''नक्कीच गरुडपुराण असावं!'' त्याच्या मनात आलं होतं. अन् त्याच्या जिभेवर त्या तांदळाच्या कण्यांच्या खिरीची आणि त्या कडक वड्याची श्राद्धाच्या जेवणातली चव जाणवून गेली! अन् त्यानं मंजूला - आपल्या बायकोला - एकदा सागितलं होतं की त्याला तो मेन्यू फार आवडतो, अन् तसा स्वयंपाक त्याच्या वाढदिवसाला

तिनं करावा, तर कसली चिडली होती ती! तर अशा प्रकारे अनेक जन्मांच्या स्मृती, कुणा ज्ञानी अस्तित्वाच्या त्याला भासांसारख्या ऐकू येणाऱ्या श्रुती आणि हे सगळं रुग्णालयीन पुराण, असं त्याचं अगदी स्मृति-श्रुति-पुराणोक्त मरण घडून येत होतं.

शांतपणे दोन हिरवे डोळे रोखून मध्ये मध्ये तोंड निळ्या वेव्ह्जनी वेडंवाकडं उघडणाऱ्या आणि बीप बीप करत बोलणाऱ्या मॉनिटरच्या वाढत्या फ्रीक्वेन्सीनं त्याला जाणवलं की आणखी एक सकाळ होत आलीय. त्याला आपला मेंदू आज खूपच ताजातवाना झालेला वाटत होता. धुकं खूपच निवळलेलं. मध्ये मध्ये स्फोटल्यासारखे वाफेचे झोत बंद झालेले. कवटी अगदी शाबूत. गुरुत्वमध्य शरीराच्या आतच जाणवणारा.

आणि मग तो क्रमानं आपल्याला कुठले कुठले पुनर्जन्म आठवतायत ते तपासून पाहायला लागलाः

तो एक शेतकरी होती. हरीराम सकपाळ. करमाळ्याजवळचा. आपल्या एका मित्राच्या मुलाच्या लग्नासाठी तो आपल्या नऊ जणांच्या एकत्र कुटुंबाबरोबर ट्रॅक्टरनं जात असताना झालेला अपघात. त्यात तो फक्त एकटा वाचला. अन् त्या वेळी पहिल्यांदा इन्स्पेक्टर हनुमंत डांगेशी आलेला त्याचा संबंध, मग इन्स्पेक्टर डांगेच्या लक्षात आलं की हरीरामचा कुणीच वाली नाही. डांगेचा एक पार्टनर होता वीज मंडळात. अरुण दामले नावाचा. दोघेही अत्यंत पाताळयंत्री. अरुण दामलेनं त्या काळात हरीरामला एकदम पासष्ट हजाराचं विजेचं बिल पाठवलं. स्वातंत्र्य नुकतंच मिळाल्यानंतरचा पंडित नेहरूंचा काळ! त्यामुळे आधी पासष्ट हजार भरा अन मग बिल जास्त असल्याची तक्रार करा. हरीरामला काय करावं सुचेना! मळा अगदी बहराला आलेला. एकदम वीज तोडून टाकली तर केवढा त्रास होईल? त्यानं सोनं-नाणं विकून पैसे भरले. बिल रास्त नसल्याची तक्रार केली. ती तीन वर्ष चालत राहिली. दरम्यान अरुण दामल्यानं आकडा, केबल, हातोडा, मोठा खिळा त्याच्या शेतात लपवून त्याच्या वीजचोरीची फौजदारी घातली. साक्षीदार म्हणून आपला साक्षीदार मारुती नवले याला बोलावलं. डांगेनं अटक करून हरीरामला आठ दिवस नरक यातना दिल्या. शेवटी शेताचा एक तुकडा विकून त्यानं दीड लाख दिले तेव्हा सोडलं. स्वातंत्र्यानंतरच्या काळात पोलीस फारच क्रूर झाले होते. अगदी ब्रिटीश काळातल्यापेक्षाही क्रूर. इन्स्पेक्टर वगैरेच्या पदांचे लिलाव वगैरेही याच काळात सुरू झाले होते. आचार्य अत्रे बिचारे एकटेच याविरुद्ध लिहीत राहिले; पण त्यांच्या 'पोलिसी राज्याचा अर्थसंकल्प' आणि तशाच इतर अग्रलेखांना कुणी गांभीर्यानं घेतलंच नाही! मग दामल्यानं वीजचोरीच्या आणखी तीन केसेस हरीरामवर घातल्या. हरीरामला डांगेनं पुन्हा ताब्यात घेतलं. त्याच्याकडून त्याच्या संपत्तीचा अगदी शेवटचा पैसा देखील जबरदस्तीनं काढून घतला आणि शेवटी त्याला ठार केलं. त्याचं प्रेत सिद्धेश्वरजवळ एक अगदी निर्जन पठार होतं, तिथे अगदी ट्रेकर्स देखील येत नसत. कोरडं, रखरखीत ओसाड पठार – त्या पठारावर नेऊन

टाकून दिलं. गिधाडांनी मांस खाऊन सापळा पांढरा स्वच्छ केला, अन् हाडं उन्हानं ठिसूळ होऊन धूळ बनून उडून गेली.

हा होता त्याला आठवणारा एक पूर्वजन्म. तो अशोक मराठे होता. लिंग्विस्टिक्सचा – भाषाशास्त्राचा प्रोफेसर – प्राध्यापक. अतिशय एककल्ली. मराठीचा अभिमानी. इंग्रजी शब्द चुकूनही न वापरणारा. आपल्या इतर कुटुंबीयांपासून फटकून वागणारा. आपल्या विक्षिप्तपणामुळे त्याच्या सगळ्या नातेवाइकांनी संबंध जवळजवळ तोडलेले अन् त्याची पत्नी होती अंजनी! त्याची हुकुमशाही प्रवृत्ती लग्नानंतर वाढत गेली. बिचारी अंजनी सहन करीत राहिली, तर त्याचा विक्षिप्तपणा वाढतच गेला. अन् सहन करणारी ती एकटी! मूल–बाळ काही नाही, मग एक दिवस टपालवाल्यानं न्यायालयाची घटस्फोटाची सूचना टपालात आणली. अंजनीनं घटस्फोटासाठी अर्ज केला होता आणि ती न्यायालयीन सूचना तो महाराष्ट्रात राहत असूनही इंग्रजीत आली याची त्याला जास्त चीड आली! अंजनी असा अर्ज करण्याची हिंमत कशी करू शकते याची जेवढी चीड आली त्यापेक्षाही जास्त! मग न्यायालयातला तो खटला, ते जाबजबाब, महाविद्यालयातल्या सहकाऱ्यांच्या त्याच्या विक्षिप्तपणाबद्दल साक्षी – सगळंच एखादं अत्यंत कंटाळवाण्या न संपणाऱ्या – हादरवून टाकणाऱ्या स्वप्नासारखं. शेवटी न्यायाधीश महाराजांनी अंजनीला इंग्रजी भाषेतून घटस्फोट दिला! ती लहान मुलीसारखी न्यायालयात टाळ्या पिटून नाचली! त्यावेळी ती पंचावन्न वर्षांची होती तरी देखील! अशोक मराठे न्यायालयाच्या बाहेर पायऱ्या उतरताना घेरी येऊन बेशुद्ध होऊन पडला. त्याचा उरलेला एकुलता एक मित्र राजा त्याला सावरायचा प्रयत्न करत होता. पण डोळ्यांसमोर खोल गरगरत आत खेचणारी अंधारी आली.

इथेच ती त्या जन्माची आठवण संपायची. सुरू कुठेही व्हायची. पण अंजनीबरोबरच्या काळात. पण संपायची इथे. अन् तो जागा व्हायचा तेव्हा तो तो असायचा ! या हॉस्पिटलच्या रुग्णालयाच्या आयसीयूमध्ये – अतिदक्षता विभागामध्ये– पलंगावर पडलेला.

तो प्राध्यापक द्वादशीवार होता. अन् अगदी तरुण वयापासूनच स्त्रियांच्या बाबतीत खूप लकी होता. जसे काही दोन–चार तीळच आहेत! खरं तर नव्हता एकदेखील! पण तरीही लकी! त्याला एक्सचेंज प्रोग्राममध्ये दोन वर्षं यू.के. मध्ये लंडनच्या एका कॉलेजमध्ये जायचा चान्स मिळाला होता. त्यावेळी तिथे तिघी जणी त्याला पटल्या होत्या. ब्रिटीश क्लारा, जेसिका आणि कॅथी. पण त्याच्या आठवणींच्या राज्यात पट्टराणीचा ताज पहेनून सिंहासनावर नेहमीच असायची ती अमीना. आणि या पूर्वजन्मातलं त्याला इतर सगळं अगदी अंधुक आठवायचं. आठवायचे ते विविध प्रकारचे, एकीबरोबरचे – अनेक जणींबरोबर एकत्र केलेले, नैसर्गिक–अनैसर्गिक, बंद जागी – खुल्या अस्मानाखाली, गच्चीवर पौर्णिमेच्या चांदण्यात, भांग पिऊन – खिलवून केलेले, मद्यधुंद अवस्थेतले धुंद साकीबरोबरचे, वेगवेगळे – संभोग! आणि ते संभोग आठवत आठवतच तो जागा व्हायचा. अन् त्याला मग लघवीसाठी लावलेल्या कॅथेटरचा त्रास व्हायचा!

त्याला स्त्री म्हणून जगलेला एक पूर्वजन्म फार स्पष्ट आठवत होता. तो रश्मी कोलते होता. रश्मीच्या आईनं तिला दहावीपासूनच योग्य मुलगा पटवण्याचं अगदी पद्धतशीर ट्रेनिंग दिलेलं. अन् त्याप्रमाणं तिनं देवेंद्र शुक्लाला पटवलं. त्याच्याशी लग्न केलं. सासऱ्याच्या पैशानं ती देवेंद्रबरोबर एम.एस. करायला अमेरिकेत गेली. कोलंबियाला. अन् मग देवेंद्र क्रिस्टल मेथ, एक्स्टसी वगैरे ड्रग्जच्या व्यसनांमध्ये वाहून गेला. पण तिनं डोकं ताळ्यावर ठेवून राहुल कुलकर्णीला पटवलं. ती देवेंद्रपासून वेगळी राहायला लागली. पण एक दिवस देवेंद्र पिस्तूल घेऊन आला अन् त्यानं गोळ्या घालून तिला ठार केलं.

या पूर्वजन्माचा रश्मी म्हणून हॉस्पिटलमध्ये मरतांनाच्या आठवणीत नेहमी शेवट व्हायचा आणि आठवणीतून जागा झाल्यावर काही काळ त्याला आपण स्त्री आहोत असंच वाटत राहायचं आणि मग काही वेळानंतर पूर्ण भान यायचं!

राखाडी प्रकाश सोनेरी झाला. पहाट झाली होती; पण हे सगळे जर त्याचे पूर्वजनम होते, तर तो या जन्मीचा कोण होता? बरोबर ! तो तर मराठीतला लेखक होता. सुधीर पारखे! अन् त्याची बायको होती मंजू पारखे! त्याला अगदी स्पष्ट सगळं आठवत होतं आज. एकोणीसशे पंचाहत्तरपासून तो अव्याहत लिहीत होता. पण म्हणावी तशी प्रसिद्धी कधी त्याला मिळाली नव्हती. कारण तो कधी कुठल्या कार्यक्रमांना जायचा नाही, 'साहित्तिकां'नी जे प्रसिद्ध होण्यासाठी करायचं असतं ते काहीही करायचा नाही. अन् आता तर मराठी 'साहित्त' म्हणजे एक व्हॅनिटी पब्लिशिंग टाइप इंडस्ट्री झालीय. अन् प्रकाशक लोक लेखकांकडून पैसे घेऊन पुस्तकं छापतायत आणि लॉटनं विकत घेणाऱ्या वितरकांना अगदी एक टक्क्यापासून पाच-दहा टक्के छापील किमतीला पुस्तकं विकतायत ! त्यांचे संच बनून लायब्ऱ्यांना वितरक विकतायत! ही आहे मराठी 'साहित्ता'ची सध्याची स्थिती! पण हे देखील आता फार काळ चालणार नाहीय! प्रिंट-ऑन-डिमांड आणि कागद रहित ई-बुक्स टपूनच बसलेत मराठीत देखील यायला! सुधीर पारखेच्या अन् जकातदारच्या म्हणजे जक्याच्या नेहमी अशा चर्चा झडायच्या! सुदैवानं उपजीविकेची त्यांची दुसरी साधनं होती म्हणून बरं! त्याला एक छानशी गुंगी आली आणि पुन्हा त्यानं डोळे उघडले तर त्याच्या कॉटशेजारी चक्क मंजू अन् जक्या बसलेले. शेजारी डॉक्टर देखील उभे. शिवाय त्याच्या चेहऱ्यावरचा ऑक्सिजनचा मास्क देखील काढलेला.

''ओळखलं का मला?'' मंजूनं साशंकपणे विचारलं.

''हो. मंजू, ओळखलं की!'' सुधीर क्षीण आवाजात म्हणाला. डॉक्टर, मंजू, जक्या तिघांनी एकमेकांकडे पाहिलं. आनंदानं अतिशय आश्चर्यानं!

''आणि हा कोण आहे?'' डॉक्टरांनी विचारलं.

''हा माझा मित्र जक्या. जकातदार.'' मंजू घळाघळा रडायलाच लागली.

''अन् तुम्ही कोण आहात?''

''मी? मी सुधीर पारखे. मराठी लेखक आणि सी.ए. चार्टर्ड अकाउंटंट.'' सुधीर पुटपुटला.

''अरे वा!'', डॉक्टर अचानक इंग्रजीत त्याला सांगायला लागले, ''तुम्हांला ॲक्सिडेंट झाला होता. दहा दिवसांपूर्वी. नंतर तुम्ही तीन दिवस कोमात होता. कालपर्यंत तुम्ही आपल्या बायकोला ओळखत नव्हता. स्वतःचं नाव कधी हरीराम सपकाळ सांगत होता. कधी प्राध्यापक व्दादशीवार! एकदा तर तुम्ही स्वतःला स्त्री समजून आपलं नाव तुम्ही रश्मी सांगितलं होतं! आता तुमची मेमरी व्यवस्थित परत आलेली दिसते! काँग्रॅच्युलेशन्स!'' आणि डॉक्टर ब्लडप्रेशर तपासून निघून गेले.

''त्या माझ्या पूर्वजन्मीच्या आठवणी होत्या,'' सुधीर म्हणाला. जक्या गदगदून हसला.

''येडेपणा नको करूस,'' तो म्हणाला.

''अरे, आपण करमाळ्याला गेलो होतो ना तुझ्या बाबांना भेटायला, तेव्हा तिथल्या एका बारमध्ये नाही का एका दारूड्यानं आपल्याशी गप्पा मारणं सुरू केलं अन् आपल्याला ती स्टोरी सांगितली – इन्स्पेक्टर हनुमंत डांगे आणि हरीराम सपकाळ यांची? हरीरामला कसं डांगेनं टॉर्चर करून मारलं त्याची!''

सुधीरच्या कपाळावर आठ्या पडल्या. खरंच त्याला जक्यानं सागितलेलं डिटेलमध्ये आठवलं.

''मग व्दादशीवर, रश्मी कोलते, अशोक मराठे वगैरे आठवतायत का तुला''

''काय, काय ? कोण ती नावं? पुन्हा एकदा सांग बरं!''

सुधीरनं पुन्हा ती नावं सांगितली.

''नाही बुवा! ही नावं नाही आठवत! पण तू कथांसाठी पात्रं म्हणून विचार केला असशील कधीतरी या नावांचा!''

''जाऊ द्या ना!'' मंजू म्हणाली, ''त्यांना मेंदूवर ताण पडेल असं काही विचारू नका. अन् तुम्ही पण कसला विचार करायचा नाही काही नाही. डॉक्टरांनी सांगितल्याप्रमाणं सगळं करायचं अन् लवकर बरं होऊन घरी यायचं!''

सुधीर तिच्याकडे पाहून हसला.

''ठीक आहे बाईसाहेब!''

मंजू आणि जक्या गेल्यानंतर पुन्हा त्याला झोप लागली. तोंडानं अन्न खाणं उद्यापासून सुरू करणार होते. अजूनही तो लाइफ सपोर्ट सिस्टिमवरच होता – जीवनाधार व्यवस्थेवर – अशोक मराठेच्या भाषेत! पण फक्त याच स्मृती नव्हत्या. इतरही अनेक. कुणाची आयुष्यं आठवत होती त्याला इतकी? जर त्याचे स्वतःचे पूर्वजन्म नसले तर तर? की त्याच्या मनातल्या कथा होत्या त्या सगळ्या? पण इतक्या तीव्र? स्वतः जगल्यासारख्या? कदाचित लेखक असण्याचा तोटा असावा हा! प्रोफेशनल रिस्क!

मग दुपारी तो पुन्हा टक्क जागा झाला आणि त्याला कसली तरी तीव्र जाणीव व्हायला लागली. शेवटपर्यंत सगळं अनिश्चितच असणार होतं तर! त्याला वाटत होतं त्याला शेवटचा असा काहीतरी अनुभव येतोय. पण कुठलीही गोष्ट शेवटची म्हटलं की त्यापुढे पुन्हा वर जाण्याच्या पायऱ्या आहेतच! पण आताची ही तीव्र जाणीव अगदी स्पष्ट प्रकाशासारखी प्रखर होती. कसले तरी लाखो रेशमी तंतू गुंडाळले जावेत तशी त्याची शरीरापासून सुटका होत होती. पुन्हा तोच जुना आभास. काळ वेगवान झाला. सूर्य झर्रर्रकन खाली खेचला गेला. राखाडी संध्याकाळ रात्रीत बदलणारच, एवढ्यात त्यानं शेवटची एक कृती केली. हात लांबवून जोर लावून त्या सरकत्या खिडकीची काच सरकवण्याचा प्रयत्न केला. खिडकीवर टेकलेली रातराणीची फांदी किंचित हलली. खिडकीत एखादा मिलिमीटर तरी फट पडली असेल का? पण दोन मिनिटांतच त्याला रातराणीचा अगदी स्पष्ट सुगंध आला. त्याच्या मॉनिटरकडे पाहणारी नर्स एकाएकी दचकली. साइन वेव्हची आता सरळ रेषा होत होती. ती त्याच्या पलंगाजवळ आल्याची बाह्य जाणीव त्याला झाली. नंतर त्याच्या सर्व जाणिवा अंतर्गत होत गेल्या. त्याला वाटलं की, आपण आकसत आहोत. आपले शरीराशी जोडलेले करोडो लाखो तंतू सुटे होऊन आत आत गुंडाळले जातायत. त्याला स्वतःचं केंद्रस्थान जाणवलं. गुरुत्त्वमध्य जाणवला. आपलं शरीर आपल्याला ढगळ होतंय अशी एक विचित्र जाणीव त्याच्या मनात उपजली. तो आणखी आकसतच गेला. सूक्ष्म होत गेला. सर्व बाजूंनी आत खेचला जाऊन बिंदूवत् झाला. युक्लिडच्या व्याख्येतला बिंदू. लांबी, रुंदी, उंची नसलेला आणि मग तो बिंदूपेक्षाही सूक्ष्म झाला आणि अवकाशाच्या कैदेतून एकाएकी मुक्त होऊन अवकाशापल्याड अवतरला. मग त्याला डोळे नसताना दिसायला लागलं. कान नसताना ऐकू यायला लागलं. सगळं

एकसंध जाणिवेसारखं जाणवायला लागलं. त्याच्या शरीरापाशी डॉक्टर्स, नर्सेस यांची लगबल सुरू झाली होती. तोंडावर पुन्हा ऑक्सिजन मास्क आलेला होता.

''हायपोथर्मिया!'' डॉक्टर म्हणत होते.

''आश्चर्य आहे ! क्रिटिकल स्टेटमधून बाहेर येऊन चांगला रिकव्हर झाला होता.''

''कसला तरी सुगंध येतोय काय ग ?'' एक नर्स दुसरीला विचारीत होती.

''हो ! रातराणीचा! मला पण जाणवला.''

प्रचंड गुरुत्वाकर्षणानं तो एका बिंदूपेक्षाही सूक्ष्म होऊन त्या जगातून नाहीसा झाला होता, आणि आता त्याला गुरुत्त्वापसरण जाणवायला लागलं होतं. हॉस्पिटलच्या वॉर्डमधून तो प्रसरण पावायला लागला. वॉर्ड छोटासा झाला. हॉस्पिटलची इमारत देखील छोटी झाली. 'गुगल अर्थ' वरचा स्लायडर खाली ओढल्यासारखी अत्यंत वेगानं पृथ्वीदेखील छोटी झाली. आता तो पृथ्वीच्या सूर्यमालेच्याही पलीकडे होता. हॉलिवुड-बॉलिवुड फिल्म्समध्ये दाखवतात तसला काही प्रकार नव्हता. एखाद्या ज्योतिसारखा सूक्ष्म आत्मा वगैरे काही भानगड नव्हती. होतं फक्त त्या जगात गुरुत्त्वाकर्षण अन् त्या जगाच्या पल्याड गुरुत्त्वापसरण. आकर्षण आणि अपसरण. आनंद विनायक जातेगावकरची कथा- गुरुत्त्वापसरणाचे प्रदेश- का शरदचंद्र वासुदेव चिरमुलेची ? मग अंगुळहुळा ही कथा कुणाची होती ? अनंतात विलीन होणं हे वर्णन अक्षरशः खरं होतं. कारण आता त्याची स्वतःची जाणीवच विरळ होत होती. तो पसरतच चालला होता. आता अवकाश नव्हता अन् काळही नव्हता. होतं ते पूर्ण स्वातंत्र्य. अन् ते अनुभवत तो विरून जात होता.विरळ होत होत नाहीसा होत होता.

या जगातला सगळा अवकाश व्यापून त्याच्याही पल्याड.

तोच होता.

सगळीकडे.

******

# अनिरुद्ध बनहट्टी



"अत्यंत समृद्ध परंपरा असलेल्या जागतिक भाषांपैकी एक म्हणजे आपली मराठी."

सध्याच्या स्थितीमध्ये हे असं बोलायला जरा धाडसीच वाटतं हे खरं. पण एकदा का ज्ञानेश्वर तुकाराम नामदेव एकनाथ बहिणाबाई पासून सुरू झालेली आणि आजही जिवंत असलेली साहित्यिकांची परंपरा पाहिली की जाणीव होते की मराठीसारखी दुसरी भाषा नाहीच. ही एकच अशी भाषा आहे जिथल्या संतकवींच्या दिंड्या घेऊन दशलक्षावधी लोक त्यांच्या ओव्या अभंग गात गात शेकडो मैल पायी तुडवतात. एकदा दोनदा नव्हे तर गेली सातशे वर्षं आणि वर्षातून दोनदा. ही एकच अशी भाषा आहे जिच्यामध्ये गेली नव्वदेक वर्षं साहित्य संमेलनं भरतात. ही एकच अशी भाषा आहे जिचं राज्य व्हावं म्हणून एकशेपाच हुतात्मे प्राण अर्पित करते झाले. आणि ही एकच अशी भाषा आहे, जिच्यात सर्व प्रकारच्या साहित्याला मुक्तद्वार आहे.

पण आजच्या घडीला मराठी साहित्य विशिष्ट शहरे आणि लोकांपर्यंतच सीमित झाले आहे. अनेक अतिशय चांगले लेखक अजूनही वाचकांत म्हणावे तितके नावाजले आणि वाचले गेलेले नाहीत. प्रा. डॉ. अनिरुद्ध बनहट्टी हे त्यातलेच एक. सिव्हिल इंजिनियरिंग मध्ये डॉक्टरेट, फ्रेंच भाषे मध्ये MA, जपानी भाषेचा डिप्लोमा व एस्परांतो या आंतरराष्ट्रीय भाषेचा प्रसार करणारे अनिरुद्ध यांची भाषा आणि तंत्रज्ञानावर जितकी पकड आहे तितकीच मानवी व्यवहारांतल्या शब्दापलिकडच्या भाषेवरही आहे. जी. एस. रायसोनी कॉलेज ऑफ इंजिनियरिंग मध्ये प्राध्यापक असलेले अनिरुद्ध बनहट्टी गेली चाळीसेक वर्षे कथा लेखन करीत आहे. सत्यकथेच्या मुशीतून (आणि सत्यकथेच्या दर्जाच्या चाळणीतून) तावून सुलाखून बाहेर पडलेल्या लेखकांपैकी ते एक. आजवर अनेक मासिक, नियतकालिकांतून त्यांच्या सुमारे पाचेकशे कथा प्रसिद्ध झालेल्या आहेत. स्वतःशी अत्यंत प्रामाणिक राहून जे स्वतःच्या मनाला योग्य वाटेल तेच लिहिणे आणि मार्केटमध्ये उठाव

कसला आहे ते न पहाता स्वतःला जे दर्जेदार वाटले तेच प्रसिद्धीला देणे हा त्यांचा खाक्या. जागतिक साहित्याच्या पटलावर चालणाऱ्या घडामोडींचा त्यांचा बारीक अभ्यास आहे. त्यांच्या कथांचा साहित्यिक दर्जा उच्च असूनही त्यांचा वाचकवर्गात म्हणावा तसा बोलबाला नाही. आज त्यांनी आपल्या काही कथा ई साहित्यसाठी दिल्या आहेत. पूर्णतः विनाअट आणि विनामूल्य. आपल्या वाचकांचा प्रतिसाद पाहून ते पुढील कथा द्यायच्या ते ठरवतील. तेव्हा मित्रांनो कथा कशा वाटल्या ते कळवाच. या तीन पैकी कोणती कथा तुम्हाला अधिक आवडली? या कथांमध्ये काय आवडलं? कोणतं वैशिष्ट्य जाणवलं?

स्त्री पुरुष संबंध, किंबहुना सर्वच माणसांचे आपसांतील संबंध वरवर कितीही सरळ दिसले तरी वरचा तलम पापुद्रा निघाला की आतली गुंतागुंत मनाला भेदून जाते. अंतर्मनाला भिडते. ही गुंतागुंत उलगडून दाखवणारे साहित्य हेच खरे साहित्य. ई साहित्य च्या द्वारे असे दर्जेदार साहित्य आपल्यासमोर येत राहिल. आपल्या प्रगल्भतेमध्ये भर घालत राहिल.

आपण सगळे मिळून अशा दर्जेदार लेखकांचे स्वागत करूया.

अनिरुद्ध बनहट्टी यांचा ई मेल पत्ता : anibanister@gmail.com

धन्यवाद

टीम ई साहित्य